॥ ॐश्रीपरमात्मने नमः॥

# अथ चतुर्दशोऽध्यायः

## अवतरणिका

*श्रीभगवंतांनी तेराव्या अध्यायाच्या शेवटी म्हटले की, ज्ञानचक्षूंनी क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाच्या भेदाला पाहणारा परमात्म्याला प्राप्त होतो. आता प्रश्न असा होतो की, ते ज्ञान कोणते आहे आणि त्याचा महिमा काय आहे तसेच त्या ज्ञानाच्या प्राप्तीचा सरळ उपाय कोणता आहे? याचे वर्णन करण्यासाठी भगवान् चौदाव्या अध्यायाचा विषय आरंभ करतात.*

*बंधन दोन गोष्टींनी होत असते. प्रकृती आणि प्रकृतीचे कार्य असलेल्या गुणांपासून! प्रकृतीच्या बंधनातून सुटका करून घेण्यासाठी भगवंतांनी तेराव्या अध्यायात विषय स्पष्ट केला. आता प्रकृतीचे कार्य असलेल्या गुणांच्या बंधनातून सुटण्यासाठी भगवान् चौदाव्या अध्यायाचा विषय आरंभ करतात आणि पहिल्या दोन श्लोकांत ज्ञानाचा महिमा वर्णन करतात.*

*श्रीभगवानुवाच*

**परं भूयः प्रवक्ष्यामि ज्ञानानां ज्ञानमुत्तमम्।**
**यज्ज्ञात्वा मुनयः सर्वे परां सिद्धिमितो गताः॥ १ ॥**

श्रीभगवान् म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **ज्ञानानाम्** | = संपूर्ण ज्ञानांत | **प्रवक्ष्यामि** | = सांगेन | **इतः** | = या संसारातून (मुक्त होऊन) |
| **उत्तमम्** | = उत्तम (आणि) | **यत्** | = जे (ज्ञान) | **पराम्** | = परम |
| **परम्** | = श्रेष्ठ | **ज्ञात्वा** | = जाणून | **सिद्धिम्** | = सिद्धीला |
| **ज्ञानम्** | = ज्ञान (मी) | **सर्वे** | = सर्वचे सर्व | **गताः** | = प्राप्त झाले आहेत. |
| **भूयः** | = पुन्हा | **मुनयः** | = मुनिलोक | | |

***व्याख्या*— परं भूयः प्रवक्ष्यामि ज्ञाननां ज्ञानमुत्तमम्—** तेराव्या अध्यायाच्या अठराव्या, तेवीसाव्या आणि चौतीसाव्या श्लोकांत भगवंतांनी क्षेत्र-क्षेत्रज्ञाचे, प्रकृति-पुरुषाचे जे ज्ञान (विवेक) सांगितले होते, तेच ज्ञान पुन्हा सांगण्यासाठी भगवान् ''**भूयः प्रवक्ष्यामि**'' पदांनी प्रतिज्ञा करतात.

लौकिक आणि पारलौकिक जितके काही ज्ञान आहे अर्थात् जितक्या काही विद्या, कला, भाषा, लिपी इत्यादींचे ज्ञान आहे, त्या सर्वांपेक्षा प्रकृति-पुरुषाचा भेद सांगणारे, प्रकृतीपासून सोडविणारे, परमात्मप्राप्ती करून देणारे हे ज्ञान श्रेष्ठ आहे, सर्वोत्कृष्ट आहे. यासारखे दुसरे कोणते ज्ञान नाहीच, असू शकत नाही, असणे शक्यही नाही. कारण दुसरी सर्वच ज्ञाने संसारात फसविणारी आहेत, बंधनात टाकणारी आहेत.

जरी ''उत्तम'' आणि ''पर'' या दोन्ही शब्दांचा एकच अर्थ होतो, तरी ज्यावेळी एका अर्थाचे दोन शब्द एकाच वाक्यात प्रयुक्त होतात, त्यावेळी त्यांचे दोन अर्थ होत असतात. म्हणून येथे ''उत्तम'' शब्दाचा अर्थ असा आहे की, हे ज्ञान प्रकृती आणि तिचे कार्य संसार-शरीर ह्यापासून संबंध-विच्छेद करविणारे असल्याने ''श्रेष्ठ'' आहे आणि ''पर'' शब्दाचा अर्थ असा आहे की, हे ज्ञान परमात्म्याची प्राप्ती करविणारे असल्याने ''सर्वोत्कृष्ट'' आहे.

**यज्ज्ञात्वा मुनयः सर्वे परां सिद्धिमितो गताः—** ज्या ज्ञानाला जाणून घेऊन अर्थात् ज्याचा अनुभव करून मोठ-मोठे मुनिलोक या संसारातून मुक्त होऊन परमात्म्याला प्राप्त झाले आहेत, ते मी सांगेन. ते ज्ञान प्राप्त झाल्यावर एखादा मुक्त होतो आणि एखादा मुक्त होत नाही असे होतच नाही, तर हे ज्ञान प्राप्त करणारे सर्वचे सर्व मुनिलोक मुक्त होतात. संसाराच्या बंधनातून, संसाराच्या परवशतेपासून सुटून जातात आणि परमात्म्याला प्राप्त होतात.

तत्त्वचिंतन करणाऱ्या ज्या मनुष्याची आपल्या शरीराशी आत्मीयता राहिली नाही तो "मुनी" म्हणविला जातो.

**परां सिद्धिम्**—म्हणण्याचे तात्पर्य असे आहे की, सांसारिक कार्यांच्या जितक्या सिद्धी आहेत अथवा योगसाधनाने प्राप्त होणाऱ्या अणिमा, महिमा, गरिमा इत्यादी जितक्या सिद्धी आहेत, त्या सर्वच वास्तविक असिद्धीच आहेत. कारण त्या सर्व जन्म-मरणाला कारण होणाऱ्या, बंधनात टाकणाऱ्या, परमात्म्याच्या प्राप्तीत अडथळा करणाऱ्या आहेत. परंतु परमात्मप्राप्तीरूपी जी सिद्धी आहे ती सर्वोत्कृष्ठ आहे, कारण ती सिद्धी प्राप्त झाल्यावर मनुष्य जन्म-मरणातून सुटून जातो.

**परिशिष्ट भाव**—(हा चौदावा अध्याय तेराव्या अध्यायाचेच परिशिष्ट आहे.) क्षेत्रक्षेत्रज्ञाच्या विभागाचे ज्ञान संपूर्ण लौकिक-पारलौकिक ज्ञानांपेक्षा उत्तम आणि सर्वोत्कृष्ट आहे. हे ज्ञान परमात्मतत्त्वाच्या प्राप्तीचा रामबाण उपाय आहे. म्हणून हे ज्ञान प्राप्त करणारे सर्वचे सर्व साधक परमात्मतत्त्वाला प्राप्त होतात अर्थात् मुक्त होतात.

**'ज्ञानानां ज्ञानमुत्तमम्'** पदांचे तात्पर्य आहे—सात्त्विक, राजस आणि तामस ज्ञानाहून तसेच लौकिक-पारलौकिक ज्ञानाहूनही उत्तम, अंतिम ज्ञान. या ज्ञानाशिवाय दुसरे कोणतेही ज्ञान परम सिद्धी प्राप्त करवू शकत नाही. एका परमात्मतत्त्वाशिवाय काहीही नाही—असा अनुभव होणेच परम सिद्धीची प्राप्ती आहे. तात्पर्य असे आहे की, परम सिद्धी प्राप्त झाल्यास क्रिया आणि पदार्थांचा अत्यंत अभाव होतो आणि एका चिन्मय सत्तेशिवाय कोणती जड वस्तू राहतच नाही, जी वास्तविक आहे.

**इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागताः।**
**सर्गेऽपि नोपजायन्ते प्रलये न व्यथन्ति च॥ २॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **इदम्** | = या | **साधर्म्यम्** | = साधर्म्याला | **च** | = आणि |
| **ज्ञानम्** | = ज्ञानाचा | **आगताः** | = प्राप्त झाले आहेत, | **प्रलये** | = महाप्रलयात |
| **उपाश्रित्य** | = आश्रय घेऊन | **सर्गे अपि** | = (ते) महासर्गातही | **न, व्यथन्ति** | = व्यथित |
| **मम** | = (जो मनुष्य) माझ्या | **न, उपजायन्ते** | = उत्पन्न होत नाहीत | | होत नाहीत. |

*व्याख्या*—**इदं ज्ञानमुपाश्रित्य**—पूर्व श्लोकात भगवंतांनी उत्तम आणि पर या दोन विशेषणाने ज्या ज्ञानाचा महिमा सांगितला होता, त्या ज्ञानाचा अनुभव करणे हेच त्याचा आश्रय घेणे आहे. त्या ज्ञानाचा अनुभव झाल्याने मनुष्याचे संपूर्ण संशय समाप्त होतात आणि तो ज्ञानस्वरूप होतो.

**मम साधर्म्यमागताः**—त्या ज्ञानाचा आश्रय घेऊन मनुष्य माझ्या साधर्म्याला प्राप्त होतात अर्थात् जसे माझ्या ठिकाणी कर्तृत्व-भोक्तृत्व नसते, तसेच त्यांच्यातही कर्तृत्व-भोक्तृत्व राहत नाही. जसा मी नेहमीसाठी निर्लिप्त-निर्विकार राहतो, तसेच त्यांनाही आपल्या निर्लिप्ततेचा आणि निर्विकारतेचा अनुभव येतो.

ज्ञानी महापुरुष भगवंतासारखे निर्लिप्त-निर्विकार तर होतात, परंतु भगवंतासारखे संसाराची उत्पत्ती, पालन आणि संहाराचे कार्य करू शकत नाहीत. मात्र योगाभ्यासाच्या बळाने एखाद्या योग्यात काही सामर्थ्य येते, परंतु ते सामर्थ्यही भगवंताच्या सामर्थ्यासमान नसते. कारण तो "युञ्जान् योगी" असतो, अर्थात् त्याने अभ्यास करून काही सामर्थ्य प्राप्त करून घेतलेले असते. परंतु भगवान् "युक्त योगी" आहेत, अर्थात् भगवंताचे ठिकाणी सामर्थ्य नेहमीच स्वतःसिद्ध असते. भगवान् सर्व काही करण्यास समर्थ आहेत—"**कर्तुमकर्तुमन्यथा कर्तुं समर्थः**" योग्याचे सामर्थ्य सीमित असते, परंतु भगवंताचे सामर्थ्य असीम असते.

**सर्गेऽपि नोपजायन्ते**—येथे "**अपि**" पदाने असे अभिप्रेत होते की, ते ज्ञानी महापुरुष महासर्गाच्या आरंभीही उत्पन्न होत नाहीत. महासर्गाच्या आदिमध्ये चौदा भुवने यांची तसेच त्या लोकांच्या अधिकारी लोकांची उत्पत्ती होत असते, परंतु ते महापुरुष उत्पन्न होत नाहीत अर्थात् त्यांना पुन्हा कर्मपरवश होऊन शरीर धारण करावे लागत नाही.

**प्रलये न व्यथन्ति च**—महाप्रलयामध्ये संवर्तक अग्नीने चर-अचर सर्व प्राणी भस्म होतात. समुद्र वाढल्यामुळे पृथ्वी बुडून जाते. चौदा भुवनात गडबड, हाहाःकार माजतो. सर्व प्राणी दुःखी होतात, नष्ट होतात. परंतु महाप्रलयात त्या ज्ञानी महापुरुषांना कोणतेही दुःख होत नाही, त्यांच्यात कसलीच हालचाल होत नाही, विकार होत नाहीत. ते महापुरुष ज्या तत्त्वाला प्राप्त झाले आहेत, त्या तत्त्वात, हालचाल, विकार नाहीतच, तर मग ते पुरुष व्यथित कसे होतील? होऊ शकत नाहीत.

महासर्गातही उत्पन्न न होणे आणि महाप्रलयातही व्यथित न होण्याचे तात्पर्य हे आहे की, ज्ञानी महापुरुषाचा प्रकृती आणि प्रकृतिजन्य गुणांशी सर्वथा संबंध-विच्छेद होतो. म्हणून प्रकृतीचा संबंध असल्यामुळे, जे जन्म-मरण होतात, दुःख होतात, चलबिचल होते, प्रकृतीशी संबंधरहित महापुरुषात ते जन्म-मरण, दुःख इत्यादी होत नाहीत.

**परिशिष्ट भाव**—कारणशरीराच्या संबंधाने 'निर्विकल्प स्थिती' होते आणि कारण-शरीराशी संबंध-विच्छेद झाल्यास (स्वयं यात) '**निर्विकल्प बोध**' होतो. निर्विकल्प स्थिती तर सविकल्पात बदलते, परंतु निर्विकल्प बोध सविकल्पात बदलत नाही. तात्पर्य असे आहे की, निर्विकल्प स्थितीत परिवर्तन होते, परंतु निर्विकल्प बोधात कधी परिवर्तन होत नाही. तो सदा जसाच्या तसा राहतो. ही गोष्ट येथे '**सर्गेऽपि नोपजायन्ते प्रलये न व्यथन्ति च**' पदांनी सांगितली गेली आहे.

महासर्ग आणि महाप्रलय प्रकृतीत होतात. प्रकृतीहून अतीत असलेल्या तत्त्वाची (परमात्म्याची) प्राप्ती झाल्यास महासर्ग आणि महाप्रलय याचा कोणताही परिणाम होत नाही. कारण प्रकृतीशी संबंधच राहत नाही. प्रकृतीशी संबंध न राहणे याला 'आत्यंतिक प्रलय' सुद्धा म्हटले गेले आहे. तात्पर्य हे आहे की, प्रकृतीचे कार्य असलेल्या शरीराला पकडल्याने मनुष्य परतंत्र होतो.* जन्म-मरणात सापडतो. परंतु प्रकृतीच्या कार्याशी संबंध-विच्छेद झाल्यास तो स्वतंत्र होतो, जीवन निरपेक्ष होते, जन्म-मरणापासून नेहमीसाठी मुक्त होतो.

'**मम साधर्म्यमागताः**' पदांचे तात्पर्य हे आहे की, जसे परमात्मा सत्-चित्-आनंदस्वरूप आहेत, तसेच त्यांना प्राप्त होणारे ज्ञानी महापुरुषसुद्धा सत्-चित्-आनंदस्वरूप होतात.

***संबंध***—*जे भगवंताच्या साधर्म्याला प्राप्त होतात ते तर महासर्गातही उत्पन्न होत नाहीत, परंतु जे प्राणी महासर्गात उत्पन्न होतात त्यांच्या उत्पन्न होण्याची कोणती प्रक्रिया असते, ती प्रक्रिया पुढील श्लोकात सांगत आहेत.*

## मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन्गर्भं दधाम्यहम्।
## सम्भवः सर्वभूतानां ततो भवति भारत॥ ३॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **भारत** | = हे भरतवंशोद्भव अर्जुन! | | आहे (आणि) | **ततः** | = त्यापासून |
| **मम** | = माझी | **अहम्** | = मी | **सर्वभूतानाम्** | = संपूर्ण प्राण्यांची |
| **महत्, ब्रह्म** | = मूळ प्रकृती तर | **तस्मिन्** | = तिच्यात | **सम्भवः** | = उत्पत्ती |
| **योनिः** | = उत्पत्तिस्थान | **गर्भम्** | = जीवरूपी गर्भ | **भवति** | = होते. |
| | | **दधामि** | = स्थापन करतो. | | |

*व्याख्या*—**मम योनिर्महद्ब्रह्म**—येथे मूळ प्रकृतीला "**महद्ब्रह्म**" म्हटले गेले आहे. याची अनेक कारणे होऊ शकतात जसे—

(१) परमात्मा लघुता आणि महत्तारहित आहेत. म्हणून ते सूक्ष्मातीसूक्ष्महीआहेत आणि महानाती महान्ही आहेत—"**अणोरणीयान्महतो महीयान्**" (श्वेताश्वतरोपनिषद् ३। २०). परंतु संसाराच्या दृष्टीने सर्वात मोठी वस्तू मूळ प्रकृतीच आहे. अर्थात् संसारात सर्वात मोठे व्यापक तत्त्व मूळ प्रकृतीच आहे. परमात्म्याशिवाय संसारात यापेक्षा वरचढ कोणते व्यापक तत्त्व नाही. म्हणून या मूळ प्रकृतीला येथे "**महद्ब्रह्म**" म्हटले गेले आहे.

(२) "**महत्**" (महत्तत्त्व अर्थात् समष्टी बुद्धी) आणि "**ब्रह्म**" (परमात्मा) यांच्या मध्यात असल्याने मूळ प्रकृतीला "**महद्ब्रह्म**" म्हटले गेले आहे.

(३) मागील (दुसऱ्या) श्लोकात "**सर्गेऽपि नोपजायन्ते प्रलये न व्यथन्ति च**" पदांत आलेल्या "सर्ग" आणि "प्रलय" शब्दाचा अर्थ क्रमाने ब्रह्मदेवाचा दिवस आणि ब्रह्मदेवाची रात्र मानला जाऊ शकतो. म्हणून त्यांचा अर्थ महासर्ग (ब्रह्मदेवाचे प्रकट होणे) आणि महाप्रलय (ब्रह्मदेवाचे लीन होणे) सिद्ध करण्यासाठी येथे "**महद्ब्रह्म**" शब्द दिला आहे. तात्पर्य जीवन्मुक्त महापुरुषांचा या मूळ प्रकृतीशीच संबंध-विच्छेद होतो, म्हणून ते महासर्गातही उत्पन्न होत नाहीत आणि महाप्रलयातही व्यथित होत नाहीत.

सर्वांचे उत्पत्ति-स्थान असल्याने या मूळ प्रकृतीला "**योनी**" म्हटले गेले आहे., याच मूळ प्रकृतीपासून अनन्त ब्रह्मांड उत्पन्न होतात आणि यातच लीन होतात. या मूळ प्रकृतीपासूनच सांसारिक अनंत शक्ती उत्पन्न होतात.

या मूळ प्रकृतीसाठी "**मम**" पदाचा प्रयोग करून भगवान् म्हणतात की, ही प्रकृती माझी आहे. म्हणून हिच्यावर अधिपत्यही माझेच आहे. माझ्या इच्छेविना ही प्रकृती आपल्या तर्फे काहीही करू शकत नाही. ही जे काही करत असते, ते सर्व माझ्या अध्यक्षतेखालीच करत असते. (९। १०)

* 'कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः' (३। ५).
'अवशं प्रकृतेर्वशात्' (९। ८).
'रात्र्यागमेऽवशः पार्थ प्रभवत्यहरागमे' (८। १९).

मी मूळ प्रकृतीपेक्षाही (**महद्ब्रह्म**) श्रेष्ठ साक्षात् परब्रह्म परमात्मा आहे. हे दाखविण्यासाठी भगवंतानी "**मम महद्ब्रह्म**" पदांचा प्रयोग केला आहे.

महद्ब्रह्मापेक्षाही श्रेष्ठ, परब्रह्म परमात्म्याचा अंश असूनही जीव परमात्म्यापासून विमुख होऊन प्रकृतीशी संबंध जोडतो. एवढेच नव्हे तर, तो प्रकृतीचे कार्य तिन्ही गुणांशी संबंध जोडतो आणि त्यापेक्षाही खालच्या दर्जाला येऊन गुणांचेही कार्य असलेल्या शरीर इत्यादीशी संबंध जोडतो आणि बंधनात सापडतो. म्हणून भगवान् "**मम महद्ब्रह्म**" पदांनी म्हणतात की, जीवाचा संबंध वास्तविक मूळ प्रकृतीपेक्षाही श्रेष्ठ असलेल्या मज परमात्म्याशी आहे—"**मम एव अंशः**" (१५।७). म्हणून प्रकृतीशी संबंध मानून जीवाने आपले पतन करून घेऊ नये.

**तस्मिन्गर्भं दधाम्यहम्**—येथे "**गर्भम्**" पद कर्म संस्कारांसहित जीवसमुदायाचा वाचक आहे. भगवान् कोणता नवीन गर्भ स्थापन करीत नाहीत. अनादिकालापासून जे जीव जन्म-मरणाच्या प्रवाहात सापडलेले आहेत, ते महाप्रलयाचे वेळी आपापल्या कर्म संस्कारांसहित प्रकृतीत लीन होतात (९।७) प्रकृतीत लीन झालेल्या जीवांची कर्म जेव्हा परिपक्व होऊन फल देण्यासाठी उन्मुख होतात, तेव्हा महासर्गाच्या आदिमध्ये भगवान् त्या जीवांचा प्रकृतीशी पुन्हा विशेष संबंध (जो कारणशरीररूपाने पूर्वीच होता) स्थापित करतात. हेच भगवंताद्वारा जीवसमुदायरूपी गर्भाचे प्रकृतिरूपी योनीत स्थापन करणे आहे.

**सम्भवः सर्वभूतानां ततो भवति भारत**—भगवंताकडून प्रकृतीमध्ये गर्भ स्थापन झाल्यावर संपूर्ण प्राण्यांची उत्पत्ती होते अर्थात् ते प्राणी स्थूल आणि सूक्ष्म शरीर धारण करून पुनर्जन्माला प्राप्त होतात. महासर्गाच्या आदिमध्ये प्राण्यांचे हे उत्पन्न होणे हेच भगवंताचा विसर्ग (त्याग) आहे, आदि कर्म आहे. (८।३)

[जीव जोपर्यंत मुक्त होत नाही तोपर्यंत प्रकृतीचा अंश असलेल्या कारणशरीराशी त्याचा संबंध कायम राहतो आणि तो महाप्रलयात कारणशरीरासहितच प्रकृतीत लीन होतो.]

**परिशिष्ट भाव**—भगवंताच्या कथनाचे तात्पर्य असे आहे की, जन्म-मरणात पडलेला असूनही जीव माझाच अंश आहे. त्याचे साधर्म्य, ऐक्य माझ्याशी आहे शरीराशी नाही.

***संबंध**—पूर्व श्लोकात समष्टी संसाराच्या उत्पत्तीची गोष्ट सांगितली, आता पुढील श्लोकात व्यष्टी शरीरांच्या उत्पत्तीचे वर्णन करीत आहेत.*

## सर्वयोनिषु कौन्तेय मूर्तयः सम्भवन्ति याः।
## तासां ब्रह्म महद्योनिरहं बीजप्रदः पिता॥४॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **कौन्तेय** | = हे कुन्तीनंदन! | **सम्भवन्ति** | = उत्पन्न होतात, | **अहम्** | = मी |
| **सर्वयोनिषु** | = संपूर्ण योनींत | **तासाम्** | = त्या सर्वांची | **बीजप्रदः** | = बीज स्थापन करणारा |
| **याः** | = (प्राण्यांची) जितकी | **महत्, ब्रह्म** | = मूळ प्रकृती तर | | |
| **मूर्तयः** | = शरीरे | **योनिः** | = माता आहे (आणि) | **पिता** | = पिता आहे. |

*व्याख्या*—**सर्वयोनिषु कौन्तेय मूर्तयः सम्भवन्ति याः**—जरायुज (जारासहित जन्मणारे मनुष्य, पशू इत्यादी), अण्डज (अण्ड्यापासून उत्पन्न होणारे पक्षी, सर्प इत्यादी), स्वेदज (घामापासून उत्पन्न होणारे उवा, लिखा इत्यादी) आणि उद्भिज (पृथ्वीला फोडून त्यातून उत्पन्न होणारे वृक्ष, लता इत्यादी)—संपूर्ण प्राण्यांच्या उत्पत्तीच्या या चार खाणी (स्थान) आहेत. या चारीपैकी एका एका स्थानातून लाखो योनीं उत्पन्न होतात. त्या लाखो योनींमधील एका योनीत जे प्राणी उत्पन्न होतात, त्या सर्वांची आकृती, वेगवेगळी असते. एका योनीत, एका जातीत उत्पन्न होणाऱ्या प्राण्यांच्या आकृतीतही स्थूल अथवा सूक्ष्म भेद राहतो अर्थात् एकासारखी एक आकृती कोणाचीही मिळत नाही. जसे एका मनुष्य योनीत अब्जावधी वर्षांपासून अब्जावधी माणसे उत्पन्न होत आली आहेत परंतु आजपर्यंत कोणत्याही मनुष्याची आकृती (रूप) दुसऱ्याशी मिळत नाही. या विषयात एका कवीने म्हटले आहे—

**पाग भाग वाणी प्रकृति आकृति वचन, विवेक।**
**अक्षर मिलत न एक-से, देखे देश अनेक॥**

अर्थात् पगडी, भाग्य, वाणी (कण्ठ), स्वभाव, आकृती, शब्द, विचार-शक्ती आणि हस्ताक्षर हे सर्व दोन मनुष्याचेही एकसारखे मिळत नाहीत. याप्रमाणे चौऱ्यांशी लाख योनीमध्ये जितकी शरीरे अनादिकालापासून उत्पन्न होत आहेत. त्या सर्वांची आकृती वेगवेगळी आहे. चौऱ्यांशी लाख योनीशिवाय देवता, पितर, गंधर्व, भूत, प्रेत इत्यादीलाही

''**सर्वयोनिषु**'' पदाच्या अंतर्गत घेतले पाहिजे.

**तासां ब्रह्म महद्योनिरहं बीजप्रदः पिता**—उपर्युक्त चार खाणी अर्थात् चौऱ्यांशी लक्ष योनीं तर शरीर उत्पन्न होण्याची स्थाने आहेत आणि त्या सर्व योनींचे उत्पत्ति-स्थान (मातेचे जागी)''**महद्ब्रह्म**'' अर्थात् मूळ प्रकृती आहे. त्या मूळ प्रकृतीमध्ये जीवरूपी बीज स्थापन करणारा पिता मी आहे.

भिन्न भिन्न वर्ण आणि आकृती असणाऱ्या नाना प्रकारच्या शरीरांत भगवान् आपले चेतन-अंशरूपी बीज स्थापित करतात. यावरुन सिद्ध होते की, प्रत्येक प्राण्यात स्थित असलेल्या परमात्म्याचा अंश हा शरीरांच्या भिन्नतेनेच भिन्न भिन्न प्रतीत होतो. वास्तविक संपूर्ण प्राण्यांत एकच परमात्मा विद्यमान आहेत (१३।२). ही गोष्ट एका दृष्टांताने समजाविली जाते. जरी दृष्टांत हा सर्वांशाने जुळत नसतो तरी बुद्धीला दार्ष्टान्ताच्या जवळ घेऊन जाण्यात सहायक होतो. कपडा आणि पृथ्वी—दोन्हीत एकाच तत्त्वाची प्रधानता आहे. कपड्याला जर पाण्यात टाकले तर तो पाण्याच्या तळाशी जातो. कपडा ताणा (उभा धागा) आणि बाणा (आडवा धागा) यांनी विणला जातो. प्रत्येक आडव्या उभ्या धाग्यांमध्ये एक सूक्ष्म छिद्र असते. कपड्यात तशी अनेक छिद्रे असतात. पाण्यात पडून राहिल्यामुळे त्याच्या संपूर्ण धाग्यात व छिद्रात पाणी भरून जाते. कपडा पाण्याबाहेर काढाल तरी त्याच्या संपूर्ण धाग्यामध्ये व छिद्रात एकच पाणी समानरूपाने भरलेले राहते. ह्या दृष्टांतात कपडा ''प्रकृती'' आहे. वेगवेगळी असंख्य छिद्रे ''शरीर'' आहेत आणि कपड्यात व सर्व छिद्रात परिपूर्ण पाणी ''परमात्मतत्त्व'' आहे. तात्पर्य स्थूल दृष्टीने तर प्रत्येक शरीरामध्ये परमात्मतत्त्व वेगवेगळे दिसून येते, परंतु सूक्ष्मदृष्टीने पाहिले तर संपूर्ण शरीरांमध्ये, संपूर्ण संसारात एकच परमात्मतत्त्व परिपूर्ण आहे.

**परिशिष्ट भाव**—चौऱ्यांशी लक्ष योनी, देवता, पितर, गंधर्व, भूत-प्रेत, पिशाच, ब्रह्मराक्षस, बालग्रह, स्थावर-जंगम, जलचर-थलचर-नभचर, जरायुज-अंडज-उद्भिज-स्वेदज इत्यादी सर्वच '**सर्वयोनिषु**' पदाच्या अंतर्गत घ्यावे. हीच गोष्ट सातव्या अध्यायाच्या सहाव्या श्लोकात '**एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय**' पदांनी आणि तेराव्या अध्यायाच्या सव्वीसाव्या श्लोकात '**यावत्सञ्जायते किञ्चित्सत्त्वं स्थावरजङ्गमम्**' पदांनी म्हटले गेले आहे.

येथे 'मूर्ती' शब्दाचा अर्थ आहे—शरीर याच्या अंतर्गत मूर्त-अमूर्त, व्यक्त-अव्यक्त दोन्ही शरीर घ्यावे. पृथ्वी, जल आणि अग्नी मूर्त आहेत, वायू आणि आकाश अमूर्त आहेत. वायुप्रधान शरीर असल्याने भूत-प्रेत-पिशाच हेही अमूर्त आहेत.

भगवंताने पहिल्या-दुसऱ्या श्लोकांत सांगितले की, प्रकृतीचा संबंध राहिला नाही तर जन्म-मरण होत नाही आणि तीसऱ्या-चवथ्या श्लोकांत सांगितले की, प्रकृतीचा संबंध राहिल्यास जन्म-मरण होते. हीच (तीसऱ्या-चवथ्या श्लोकाची) गोष्ट पुढे पाचव्यापासून अठराव्या श्लोकापर्यंत विस्ताराने सांगितली आहे.

*संबंध—परमात्मा आणि त्यांची शक्ती प्रकृतीच्या संयोगाने उत्पन्न होणारे जीव प्रकृतिजन्य गुणांनी कसे बांधले जातात—या विषयाचे विवेचन पुढील श्लोकापासून आरंभ करतात.*

## सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसम्भवाः।
## निबध्नन्ति महाबाहो देहे देहिनमव्ययम्॥ ५॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **महाबाहो** | = हे महाबाहो! | **रजः** | = रज (आणि) | **अव्ययम्** | = अविनाशी |
| **प्रकृतिसम्भवाः** | = प्रकृतीपासून उत्पन्न होणारे | **तमः** | = तम | **देहिनम्** | = देहीला (जीवात्म्याला) |
| | | **इति** | = —हे तिन्ही | **देहे** | = देहात |
| **सत्त्वम्** | = सत्त्व, | **गुणाः** | = गुण | **निबध्नन्ति** | = बांधून टाकतात. |

*व्याख्या*—**सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसम्भवाः**—तीसऱ्या आणि चौथ्या श्लोकात ज्या मूळ प्रकृतीला ''महद्ब्रह्म'' नावाने म्हटले आहे, त्याच मूळ प्रकृतीपासून सत्त्व, रज आणि तम हे तीन गुण उत्पन्न होतात.

येथे ''**इति**'' पदाचे तात्पर्य या तिन्ही गुणांपासून अनन्त सृष्टी उत्पन्न होतात तसेच तिन्ही गुणांच्या तारतम्याने प्राण्यांचे अनेक भेद होतात परंतु गुण मात्र दोन किंवा चार होत नाहीत. तर तीनच राहतात.

**निबध्नन्ति महाबाहो देहे देहिनमव्ययम्**—हे तिन्ही गुण अविनाशी देहीला देहात बांधून टाकतात. वास्तविक पाहिले तर हे तिन्ही गुण आपल्यातर्फे कोणालाही बांधत नाहीत, तर हा पुरुषच या गुणांशी संबंध जोडून बांधला जातो. तात्पर्य गुणांचे कार्य पदार्थ, धन, परिवार, शरीर, स्वभाव, वृत्ती, परिस्थिती, क्रिया, इत्यादींना आपले समजल्याने हा जीव स्वतः

अविनाशी असूनही बांधला जातो, विनाशी पदार्थ, धन इत्यादींना वश होतो, संपूर्णपणे स्वतंत्र असूनही पराधीन होतो. जसे मनुष्य ज्या धनाला आपले समजतो, त्या धनाच्या घट-वाढीने त्याच्या स्वत:वर परिणाम होतो. ज्या व्यक्तींना आपले समजतो, त्यांच्या जन्मण्या-मरण्याने त्याच्या स्वत:वर परिणाम होतो. ज्या शरीराला आपले समजतो, त्याच्या घट-वाढीने त्याच्या स्वत:वर परिणाम होतो. हेच अविनाशी देहीला गुणांनी बांधणे आहे.

ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे की, हा देही स्वत: अविनाशीरूपाने जसाच्या तसा राहत असूनही गुणांच्या, गुणांच्या वृत्तींच्या अधीन होऊन स्वत: सात्त्विक, राजस आणि तामस होतो. गोस्वामी तुलसीदासजी म्हणतात—

**ईश्वर अंस जीव अबिनासी। चेतन अमल सहज सुखरासी॥**

(मानस ७।११७।१)

जीवाचे हे अविनाशी स्वरूप वास्तविक कधी गुणांनी बांधले जात नाही, परंतु जेव्हा तो विनाशी देहाला ''मी'', ''माझे'' आणि ''माझ्यासाठी'' समजतो, तेव्हा तो आपल्या ह्या मान्यतेमुळे गुणांनी बांधला जातो आणि त्याला परमात्म-प्राप्तीत कठीणता होते. (१२।५) देहाभिमानामुळे गुणांनी देहात बांधले गेल्याने तो गुणातीत असलेल्या आपल्या अविनाशी स्वरूपाला जाणू शकत नाही. गुणांनी देहात बद्ध झाला तरी जीवाचे जे वास्तविक अविनाशी स्वरूप आहे, ते जसेच्या तसेच राहत असते. भगवंतांनी येथे ''**अव्ययम्**'' पदाने याकडे लक्ष वेधले आहे.

येथे ''**देहिनम्**'' पदाचे तात्पर्य, हे आहे की, देहाविषयी तादात्म्य, ममता आणि कामना असल्यामुळेच तिन्ही गुण या पुरुषाला देहात बांधून टाकतात. जर देहाविषयी तादात्म्य, ममता आणि कामना राहिली नाही, तर मग हा परमात्म- स्वरूपच आहे.

## विशेष गोष्ट

जीव शरीराशी दोन प्रकाराने आपला संबंध जोडतो—(१) ''**अभेदभावाने**''—आपल्या स्वत:ला शरीरात समजतो, ज्यामुळे ''मी शरीर आहे'' असे दिसू लागते आणि (२)''**भेदभावाने**''—शरीराला आपल्या स्वत:मध्ये समजतो ज्यामुळे ''शरीर माझे आहे'' असे दिसू लागते. अभेदभावाने संबंध जोडल्याने जीव स्वत:ला शरीर समजतो, ज्याला 'अहंता' म्हणतात आणि भेदभावाने संबंध जोडल्याने जीव शरीराला माझे समजतो ज्याला ''ममता'' म्हणतात. अशा प्रकारे शरीराशी आपला संबंध जोडल्याने सत्त्व, रज आणि तम तिन्ही गुण आपल्या वृत्तीद्वारा शरीरात अहंता, ममता दृढ करून जीवाला बांधून टाकतात.

जसे विवाह झाला असता पत्नीच्या संपूर्ण परिवाराशी (सासुरवाडी) संबंध जुटतो. पत्नीच्या वस्त्राभूषण इत्यादीची आवश्यकता, आपली स्वत:ची आवश्यकता वाटू लागते, तसेच शरीराशी मी-माझेपणाचा संबंध जोडला असता जीवाचा संपूर्ण संसाराशी संबंध जुटतो आणि शरीरनिर्वाहाच्या वस्तूंना तो आपली आवश्यकता मानू लागतो. अनित्य शरीराशी संबंध (एकात्मता) मानल्यामुळे तो अनित्य शरीराला नित्य ठेवण्याची इच्छा करू लागतो. कारण तो स्वत: नित्य आहे. शरीराशी संबंध मानल्यामुळेच त्याला मरण्याचे भय वाटते, कारण शरीर मरणारे आहे. जर शरीराशी संबंध राहीला नाही तर मग शरीराला नित्य ठेवण्याची इच्छाही राहणार नाही आणि मरण्याचे भयही राहणार नाही. म्हणून जोपर्यंत नित्य कायम राहण्याची इच्छा आणि मरण्याचे भय आहे, तोपर्यंत तो गुणांनी बांधला आहे असे समजावे.

जीव स्वत: अविनाशी आहे आणि शरीर विनाशी आहे. शरीराचा प्रत्येक क्षणाला आपोआप वियोग होत आहे. ज्याचा आपोआप वियोग होत आहे, त्याच्याशी संबंध-विच्छेद करण्यात काय कठिणता आणि काय प्रयत्न? प्रयत्न एवढाच करावयाचा आहे की, आपणहून वियुक्त होणाऱ्या वस्तूला आपण पकडून ठेवावयाचे नाही. त्याला न पकडण्याने आपल्या अविनाशी, गुणातीत स्वरूपाचा आपोआप अनुभव होईल.

**परिशिष्ट भाव**—प्रकृतीपासून उत्पन्न झाल्यामुळे सत्त्व, रज आणि तम—हे तिन्ही गुण प्रकृती विभागातच आहेत. परंतु प्रकृतीचे कार्य असलेल्या शरीराशी आपला संबंध ('मी' आणि 'माझे') मानल्यामुळे हे गुण अविनाशी चेतनाला नाशवान्, जड शरीरात बांधतात अर्थात् 'मी शरीर आहे आणि शरीर माझे आहे'—असा देहाभिमान उत्पन्न करतात. तात्पर्य हे आहे की, सर्वच विकार प्रकृतीच्या संबंधाने उत्पन्न होतात. सत्तामात्र स्वरूपात कोणताही विकार नाही—'**असङ्गो ह्ययं पुरुषः**' (बृहदारण्यक० ४।३।१५), '**देहेऽस्मिन्पुरुषः परः**' (गीता १३।२२). विकारांमुळेच जन्म-मरण होते.

वास्तविक गुण जीवाला बांधत नाहीत, तर जीवच त्यांचा संग करून बांधला जातो (याच अध्यायाचा एकवीसावा श्लोक). जर गुण बांधणारे असते तर गुणांच्या अस्तित्वात कोणी त्यापासून सुटू शकलाच नसता, जीवन्मुक्त झालाच नसता!

***संबंध**—पूर्व श्लोकात भगवंतांनी सत्त्व, रज आणि तम—या तिन्ही गुणांनी देही बांधला जातो हे सांगितले. त्या गुणांपैकी सत्त्वगुणाचे स्वरूप आणि त्याचा बांधण्याचा प्रकार भगवान् पुढील श्लोकात सांगत आहेत.*

# तत्र सत्त्वं निर्मलत्वात्प्रकाशकमनामयम्।
# सुखसङ्गेन बध्नाति ज्ञानसङ्गेन चानघ॥ ६॥

**अनघ** = हे निष्पाप अर्जुन!
**तत्र** = त्या गुणांपैकी
**सत्त्वम्** = सत्त्वगुण
**निर्मलत्वात्** = निर्मळ (स्वच्छ) असल्यामुळे
**प्रकाशकम्** = प्रकाशक (आणि)
**अनामयम्** = निर्विकार आहे.
**सुखसङ्गेन** = (तो) सुखाच्या आसक्तीने
**च** = आणि
**ज्ञानसङ्गेन** = ज्ञानाच्या आसक्तीने
**बध्नाति** = (देहीला) बांधून टाकतो.

*व्याख्या*— **तत्र सत्त्वं निर्मलत्वात्**—पूर्व श्लोकात सत्त्व, रज आणि तम—या तिन्ही गुणांविषयी चर्चा केली. या तीन गुणांपैकी सत्त्वगुण निर्मळ (मळरहित) आहे. तात्पर्य रजोगुण आणि तमोगुणाप्रमाणे सत्त्वगुणात मलिनता नाही. तर हा रजोगुण आणि तमोगुणापेक्षा निर्मळ, स्वच्छ आहे. निर्मळ असल्याकारणाने हा परमात्मतत्त्वाचे ज्ञान करविण्यात सहायक आहे.

**प्रकाशकम्**—सत्त्वगुण निर्मळ, स्वच्छ असल्याने प्रकाश करणारा आहे. जसे प्रकाशामध्ये वस्तू जशा स्पष्ट दिसतात, तसेच सत्त्वगुणाची अधिकता असल्यामुळे रजोगुण आणि तमोगुणाच्या वृत्ती स्पष्ट दिसून येतात. रजोगुण व तमोगुण यांचेपासून उत्पन्न होणारे काम, क्रोध, लोभ, मद, मात्सर्य इत्यादी दोषही स्पष्ट दिसू लागतात अर्थात् या सर्व विकारांचे स्पष्ट ज्ञान होते.

सत्त्वगुणाची वृद्धी झाल्यावर इंद्रियात प्रकाश, चेतना आणि हलकेपणा विशेषत्वाने जाणवतो. ज्यामुळे प्रत्येक पारमार्थिक आणि लौकिक विषयाला उत्तम प्रकारे समजून घेण्यात बुद्धी पूर्ण रीतीने काम करते आणि कार्य करण्यात मोठा उत्साह राहतो.

सत्त्वगुणाची दोन रूपे आहेत (१) शुद्ध सत्त्व, ज्यात परमात्म्याचा उद्देश असतो आणि (२) मलीन सत्त्व, ज्यात सांसारिक भोग आणि संग्रहाचा उद्देश असतो.*

शुद्ध सत्त्वगुणामध्ये परमात्म्याचा उद्देश असल्याने परमात्म्याकडे वाटचाल करण्यात स्वाभाविक आवड असते. मलीन सत्त्वगुणात पदार्थांचा संग्रह आणि सुखभोगाचा उद्देश असल्याने सांसारिक प्रवृत्तीत आवड असते, ज्यामुळे मनुष्य बांधला जातो.

मलीन सत्त्वगुणातही बुद्धी सांसारिक विषयांना उत्तम प्रकारे समजून घेण्यास समर्थ असते. जसे, सत्त्वगुणाच्या वृद्धीतच वैज्ञानिक नवीन नवीन अविष्कार करत असतो, परंतु त्याचा उद्देश परमात्म्याची प्राप्ती नसल्याने तो अहंकार, मान-सन्मान, धन इत्यादींनी संसारबंधनात राहतो.

**अनामयम्**—सत्त्वगुण हा रज आणि तमापेक्षा विकार-रहित आहे. वास्तविक प्रकृतीचे कार्य असल्याने हा सर्वथा विकाररहित नसतो. सर्वथा निर्विकार तर आपले स्वरूप अथवा परमात्मतत्त्वच असते, जे गुणातीत असते. परमात्मतत्त्वाच्या प्राप्तीत सहायक असल्याने भगवंतांनी सत्त्वगुणालाही विकाररहित म्हटले आहे.

**सुखसङ्गेन बध्नाति ज्ञानसङ्गेन चानघ**—जेव्हा अंतः-करणाची सात्त्विक वृत्ती असते, कोणता विकार नसतो, तेव्हा एक सुख मिळत असते, शांती मिळत असते. त्यावेळी साधकाच्या मनात असा विचार येतो की, असे सुख नेहमी कायम रहावे, अशी शांती नित्य रहावी, अशी निर्विकारता कायम रहावी. परंतु जेव्हा निर्विकारता, सुख शांती राहत नाही तेव्हा साधकाला बरे वाटत नाही, हे बरे वाटणे आणि बरे न वाटणे हीच सत्त्वगुणाच्या सुखाची आसक्ती आहे जी बंधनात टाकणारी आहे.

जेव्हा सत्त्व, रज आणि तम, या तीन्ही गुणांचे, यांच्या वृत्तींचे, विकारांचे स्पष्ट ज्ञान होते आणि साधकाला अशा पुष्कळशा आश्चर्यजनक गोष्टींची माहिती होते, ज्याची पूर्वी कधी ओळखही नव्हती, तेव्हा साधकाच्या मनात येते की, हे ज्ञान नेहमी कायम रहावे. ही ज्ञानाची आसक्ती आहे, जी बंधनात टाकणारी आहे. ''मी दुसऱ्यापेक्षा अधिक (विशेष) जाणतो'' असा अभिमानही बंधनात टाकणारा आहे.

अशा प्रकारे सत्त्वगुण सुख आणि ज्ञान याच्यासंगाने (आसक्ती) साधकाला बंधनात टाकतो अर्थात् त्याला गुणातीत होऊ देत नाही. हा संगच रजोगुण आहे, जो बांधणारा आहे (१३।२१). जर साधकाने सुख आणि ज्ञान याचासंग केला नाही तर सत्त्वगुण त्याला बंधनात टाकणार नाही, तर त्याला गुणातीत करवितो. तात्पर्य जर संग नसेल तर साधक सत्त्वगुणानेही आपली उन्नती करून घेतो आणि आपल्या गुणातीत स्वरूपाचा अनुभव करून घेतो.

* परमात्म्याचा उद्देश नसल्याकारणाने याला ''मलिन सत्त्व'' म्हटले गेले आहे. मलिन सत्त्वात रजोगुण साथीला असतो.

सत्त्वगुणापासून सुख आणि ज्ञान झाल्यास साधकाने ही सावधगिरी बाळगली पाहिजे की, हे सुख आणि ज्ञान माझे ध्येय नाही. हे माझे भोग्य नाहीत. हे तर ध्येयाच्या प्राप्तीस कारण आहेत. मला तर त्या ध्येयाची प्राप्ती करावयाची आहे, जे या सुख आणि ज्ञानाला प्रकाशित करणारे आहे.

सुख, ज्ञान इत्यादी सर्वच सत्त्वगुणाच्या वृत्ती आहेत. ह्या कधी घटतात, कधी वाढतात, कधी येतात, कधी जातात. परंतु आपले स्वरूप निरंतर एकरस राहत असते. त्यात कधी घट-वाढ होत नाही. म्हणून साधकाने सत्त्व गुणाच्या वृत्तींपासून नेहमी तटस्थ, उदासीन रहावे. त्यांचा उपभोग करू नये. त्यामुळे तो सुख आणि ज्ञानाच्या आसक्तीत फसणार नाही.

जर साधकाने सत्त्वगुणापासून होणाऱ्या सुख आणि ज्ञानाचा संग केला नाही, तर त्याला लवकरच परमात्मप्राप्ती होते. परंतु जर त्याने यांच्या संगाचा त्याग केला नाही तर (परमात्मप्राप्तीचे ध्येय असल्याने) कालांतराने त्याची त्या सुख आणि ज्ञानाविषयी आपोआप आवड होत असते आणि तो परमात्मप्राप्ती करून घेतो.

**परिशिष्ट भाव**—येथे भगवंताने सत्त्वगुणाला अनामय (निर्विकार) म्हटले आहे—ही सत्त्वगुणाची विलक्षणता आहे. कारण सत्त्वगुण गुणातीत होण्याच्या फार जवळ आहे. जरी सत्त्वगुण निर्विकार आहे, परंतु संगामुळे तो विकारी होतो—'**सुखसङ्गेन बध्नाति ज्ञानसङ्गेन चानघ**'. कारण संग रजोगुणाचे स्वरूप आहे—'**रजो रागात्मकं विद्धि**' (गीता १४।७). सुख आणि ज्ञान बाधक नाहीत, तर त्यांचा संग बाधक आहे. त्याला आपले मानणे हा संग आहे. वास्तविक सत्त्वगुण आपला नाहीच, तो तर प्रकृतीचा आहे.

मनुष्यात रजोगुणाची प्रधानता राहते—'**रजसि प्रलयं गत्वा कर्मसङ्गिषु जायते**' (१४।१५), '**मध्ये तिष्ठन्ति राजसाः**' (१४।१८). म्हणून जोपर्यंत संग राहतो, तोपर्यंत मुक्ती प्राप्त होत नाही. कारण स्वरूप असंग आहे.

भगवंताने सत्त्वगुणालाही अनामय म्हटले आहे आणि परमपदालाही अनामय म्हटले आहे—'**पदं गच्छन्त्यनामयम्**' (२।५१). यावरुन असे समजून घ्यावे की, सत्त्वगुण तर सापेक्ष अनामय आहे आणि परमपद निरपेक्ष अनामय आहे.

तिन्ही गुण प्रकृतिजन्य असूनही रजोगुण तृष्णा तसेच आसक्तीने उत्पन्न होणारा आणि तमोगुण अज्ञानाने उत्पन्न होणारा आहे (याच अध्यायाचा सातवा-आठवा श्लोक), परंतु सत्त्वगुण केवळ प्रकृतिजन्य आहे. तात्पर्य असे आहे की, सत्त्वगुण प्रकृतिजन्य तर आहे परंतु कोण्या विकारापासून उत्पन्न होत नाही. म्हणून त्याला 'अनामय' म्हटले गेले आहे.

सात्त्विक सुख आणि सात्त्विक ज्ञान हेही स्वयंचे नाहीत, तर प्रकृतिजन्य असल्याने 'पर' चे आहेत अर्थात् पराधीन आहेत. यात पराधीनतेचे सुख आहे, आपल्या स्वरूपाचे सुख नाही.

**सात्त्विक ज्ञान आणि तत्त्वज्ञानातील फरक**—सात्त्विक ज्ञानात तर 'मी ज्ञानी आहे' हा संग आहे, परंतु तत्त्वज्ञान संपूर्णपणे असंग आहे अर्थात् तत्त्वज्ञान झाल्यावर ज्ञान राहते, परंतु 'मी ज्ञानी आहे'—हे (ज्ञानी) राहत नाही. सात्त्विक ज्ञानात द्रष्टा राहतो आणि आपल्यात विशेषतेचे भान होते, परंतु तत्त्वज्ञानात कोणी द्रष्टा राहत नाही आणि आपल्यात कोणती उणीवही राहत नाही तसेच विशेषतेचे भानही होत नाही, कारण व्यक्तित्त्व राहत नाही. आपल्यात विशेषतेचा अनुभव होणे हाच संग आहे. विशेषतेचा अनुभव 'मी ज्ञानी आहे'—असे स्वीकार केल्याने होतो. तत्त्वज्ञान झाल्यावर निजानंदाचा अनुभव येतो. तेराव्या अध्यायाच्या सत्तावीसाव्या श्लोकात सात्त्विक ज्ञानाचे आणि अठ्ठावीसाव्या श्लोकात तत्त्वज्ञानाचे वर्णन झाले आहे.

***संबंध***—*रजोगुणाचे स्वरूप आणि त्याच्या बांधण्याचा कोणता प्रकार आहे—हे पुढील श्लोकात सांगत आहेत.*

**रजो रागात्मकं विद्धि तृष्णासङ्गसमुद्भवम्।**
**तन्निबध्नाति कौन्तेय कर्मसङ्गेन देहिनम्॥ ७॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **कौन्तेय** | = हे कुंतीनंदन! | **रजः** | = रजोगुणाला (तू) | **कर्मसङ्गेन** | = कर्मांच्या आसक्तीने |
| **तृष्णासङ्ग** | = तृष्णा आणि | **रागात्मकम्** | = आसक्तिस्वरूप | **देहिनम्** | = देहीला |
| **समुद्भवम्** | आसक्ती उत्पन्न | **विद्धि** | = समज. | | (जीवात्म्याला) |
| | करणाऱ्या | **तत्** | = तो | **निबध्नाति** | = बांधून टाकतो. |

*व्याख्या*—**रजो रागात्मकं विद्धि**—हा रजोगुण आसक्तिस्वरूप आहे अर्थात् एखाद्या वस्तू, व्यक्ती, परिस्थिती, घटना, क्रिया इत्यादीविषयी जी प्रीयता उत्पन्न होते, ती प्रीयता रजोगुणाचे स्वरूप आहे.

**रागात्मकम्**—म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, जसे सोन्याची आभूषणे सोनेरूप असतात, तसेच रजोगुण आसक्तिरूप असतो.

पातञ्जलयोगदर्शनात ''क्रिये''ला रजोगुणाचे स्वरूप म्हटले गेले आहे.* परंतु श्रीमद्भगवद्गीतेत भगवान् (सर्व क्रियांना गौणरूपाने रजोगुण मानत असूनही) प्रमुख्याने आसक्तीलाच रजोगुणाचे स्वरूप मानतात.† म्हणून ''**योगस्थः कुरु कर्माणि सङ्गं त्यक्त्वा**'' (२।४८) पदांत आसक्तीचा त्याग करून कर्तव्यकर्म करण्याची आज्ञा दिली गेली आहे. निष्कामभावनेने केली गेलेली कर्म मुक्त करणारी असतात (३।१९). याच अध्यायाच्या बावीसाव्या श्लोकात भगवान् म्हणतात की, ''प्रवृत्ती'' अर्थात् क्रिया करण्याचा भाव उत्पन्न झाल्यावरही गुणातीत पुरुषाची त्यात आसक्ती नसते. तात्पर्य गुणातीत पुरुषामध्येसुद्धा रजोगुणाच्या प्रभावाने प्रवृत्ती तर होत असते, परंतु ती आसक्तिपूर्वक नसते. गुणातीत होण्यात सहायक असला तरीही सत्वगुणाला सुख आणि ज्ञानाच्या आसक्तीने बांधणारा म्हटले गेले आहे. यावरुन सिद्ध होते की, आसक्तीच बंधनकारक आहे, सत्त्वगुण स्वतः नव्हे म्हणून भगवान् येथे आसक्तीलाच रजोगुणाचे मुख्य स्वरूप जाणून घेण्यासाठी म्हणत आहेत.

महासर्गाच्या आदिमध्ये परमात्म्याचा ''**बहु स्यां प्रजायेय**'' हा संकल्प होतो. हा संकल्प रजोगुणी आहे. यांला गीतेने ''कर्म'' नावाने संबोधले आहे. (८।३) ज्याप्रमाणे दही घुसळल्याने लोणी आणि ताक वेगवेगळे होत असते, त्याचप्रमाणे सृष्टिरचनेच्या या रजोगुणी संकल्पाने प्रकृतीमध्ये क्षोभ उत्पन्न होतो, त्यामुळे सत्त्वगुणरूपी लोणी आणि तमोगुणरूपी ताक वेग-वेगळे होते. सत्त्वगुणाने अंतःकरण आणि ज्ञानेंद्रिये, रजोगुणाने प्राण आणि कर्मेंद्रिये तसेच तमोगुणाने स्थूल पदार्थ, शरीर इत्यादीची निर्मिती होते. तिन्ही गुणांनी संसारातील इतर पदार्थांची उत्पत्ती होत असते. अशा प्रकारे महासर्गाच्या आदिमध्ये भगवंताचे सृष्टिरचनारूपी कर्मसुद्धा सर्वथा रागरहित होते (४।१३)

**तृष्णासङ्गसमुद्भवम्**—प्राप्त वस्तु, व्यक्ती, पदार्थ, परिस्थिती, घटना इत्यादी कायम रहावे, तसेच ते आणखीही प्राप्त होत रहावेत—''**जिमि प्रतिलाभ लोभ अधिकाई**'' या प्रमाणे तृष्णा उत्पन्न होते. या तृष्णेने मग वस्तू इत्यादीविषयी आसक्ती उत्पन्न होते.

व्याकरणानुसार या ''**तृष्णासङ्गसमुद्भवम्**'' पदाचे दोन अर्थ होतात (१) ज्यामुळे तृष्णा आणि आसक्ती उत्पन्न होते.‡ अर्थात् तृष्णा आणि आसक्तीला उत्पन्न करणारा आणि (२) जो तृष्णा आणि आसक्तीने उत्पन्न होतो.卐 अर्थात् तृष्णा आणि आसक्तीने उत्पन्न होणारा. जसे बीज आणि वृक्ष अन्योन्य कारण आहेत अर्थात् बीजापासून वृक्ष उत्पन्न होतो आणि वृक्षापासून मग पुष्कळशी बीजे उत्पन्न होतात, त्याचप्रमाणे रागस्वरूप (आसक्तियुक्त) रजोगुणापासून तृष्णा आणि आसक्ती वाढते तसेच तृष्णा आणि आसक्तीने रजोगुण फार वाढत जातो. तात्पर्य, हे दोन्हीही एकमेकांना पुष्ट करणारे आहेत. म्हणून दोन्हीही अर्थ योग्य आहेत.

**तन्निबध्नाति कौन्तेय कर्मसङ्गेन देहिनम्**—रजोगुण कर्मांच्या आसक्तीने शरीरधाऱ्याला बंधनात टाकतो. अर्थात् रजोगुण वाढल्यावर जसजशी तृष्णा आणि आसक्ती वाढत जाते, तसतशी मनुष्याची कर्म करण्याची प्रवृत्ती वाढत राहते. कर्म करण्याची प्रवृत्ती वाढल्याने मनुष्य नव-नवीन कर्म करणे सुरू करतो. मग तो रात्रंदिवस याच प्रवृत्तीत फसून राहतो अर्थात् माणसाच्या मनोवृत्ती रात्रंदिवस नव-नवीन कर्म आरंभ करण्याच्या चिंतनात लागून राहतात. अशा अवस्थेत त्याला आपले कल्याण करण्याला, उद्धार करून घेण्याला अवसरच प्राप्त होत नाही. अशा प्रकारे रजोगुण कर्मांच्या सुखासक्तीने शरीरधाऱ्याला बांधून टाकतो अर्थात् जन्म-मरणाच्या चक्रात घालतो. म्हणून साधकाने प्राप्त परिस्थितीनुसार निष्कामभावनेने

---

* प्रकाशक्रियास्थितिशीलं भूतेन्द्रियात्मकं भोगापवर्गार्थं दृश्यम्। (योगदर्शन २।१८)

† श्रीमद्भगवद्गीतेची एक फार मोठी विलक्षणता ही आहे की, ती कोणाच्याही मताचे खण्डन न करता त्या विषयाची आपली मान्यता प्रकट करते. गीतेत भगवंतांनी क्रियेलाही रजोगुण मानले आहे. ''लोभः प्रवृत्तिरारम्भः कर्मणाम्'' (१४।१२) आणि क्रियेला सात्त्विकही मानले आहे (१८।२३). म्हणून दोष क्रियेत नाही, तर राग अथवा आसक्तीत आहे. आसक्तिपूर्वक केलेली कर्मच बांधतात. तात्पर्य, मनुष्य कर्मांच्या आसक्ती आणि फलेच्छेनेच बांधला जातो, कर्म केल्याने नव्हे. आसक्ती न राहिल्यास संपूर्ण कर्म करूनही मनुष्य बांधला जात नाही. (४।१९) जर केवळ क्रियाच बंधनकारक असती तर जीवन्मुक्त महापुरुषांनाही बंधन झाले असते, कारण क्रिया तर त्यांच्याकडूनही होतच असते. (१४।२२). भगवंताकडून सृष्टीची रचना करणे हे ''कर्म'' आहे तसेच अवतार घेऊन तेही क्रिया (लीला) करतात, परंतु कर्मात आसक्ती नसल्याने त्यांना कर्म बांधत नाहीत. (९।९)

अठराव्या अध्यायाच्या तेवीसाव्या, चोवीसाव्या आणि पंचवीसाव्या श्लोकात भगवंतांनी सात्त्विक, राजस आणि तामस तीन प्रकारच्या कर्मांचे वर्णन केले आहे. जर केवळ कर्म रजोगुणच असते, तर मग त्यांचे सात्त्विक आणि तामस भेद कसे होतात? यावरून सिद्ध होते की, गीता प्रामुख्याने आसक्तीलाच रजोगुण म्हणते.

‡ तृष्णायाः सङ्गस्य च समुद्भवो यस्मात्।

卐 तृष्णायाः सङ्गाच्च समुद्भवो यस्य।

कर्तव्यकर्म तर केले पाहिजे, परंतु संग्रह आणि सुखभोगासाठी नव-नवीन कर्मांचा आरंभ करू नये.

"**देहिनम्**" पदाचे तात्पर्य हे आहे की, देहाशी आपला संबंध मानणाऱ्या देहीलाच हा रजोगुण कर्मांच्या आसक्तीने बांधतो.

सकामभावनेने कर्म करण्यापासूनही एक सुख होत असते आणि "कर्माचे अमुक फल भोगू" या फलासक्तीतही एक सुख असते. अशा कर्म आणि फलाच्या सुखासक्तीने मनुष्य बांधला जातो.

कर्मांच्या सुखासक्तीपासून सुटण्यासाठी साधकाने हा विचार करावा की, हे पदार्थ, व्यक्ती, परिस्थिती, घटना इत्यादी किती दिवस आपल्याबरोबर राहणार आहेत. कारण सर्व दृश्य प्रत्येक क्षणाला अदृश्याकडे जात आहे, जीवन प्रत्येक क्षणाला मृत्यूकडे धाव घेत आहे, सर्ग प्रतिक्षणाला प्रलयाकडे वाटचाल करीत आहे. महासर्ग प्रत्येक क्षणाला महाप्रलयाकडे जात आहे. आजपर्यंत ज्या बाल्य, तारुण्य इत्यादी अवस्था निघून गेल्या, त्या पुन्हा मिळू शकत नाहीत. जो काळ निघून गेला तो पुन्हा मिळू शकत नाही. मोठमोठे राजे महाराजे आणि श्रीमंतांच्या अंतिम दशेचे स्मरण केल्याने तसेच मोठमोठ्या राजमहालांकडे आणि पडक्या घरांकडे पाहून साधकाने हा विचार करावा की, त्यांची जी दशा झाली आहे, तीच दशा या शरीराची, धन-संपत्तीची आणि घर इत्यादींचीही होईल. परंतु मी यांच्या प्रलोभनामध्ये फसून आपल्या शक्ती, बुद्धी, वेळ यांना व्यर्थ खर्च केले, घालविले. ही तर फार मोठी हानी झाली. असा विचार उत्पन्न झाल्यास साधकाच्या अंत:करणात सात्त्विक वृत्ती येईल आणि तो कर्मसंगातून मुक्त होईल.

जर मी रात्रंदिवस नवनवीन कर्म करण्यातच मग्न राहिलो, तर माझा मनुष्यजन्म निरर्थक जाईल आणि त्या कर्माच्या आसक्तीमुळे मला न जाणो कोण कोणत्या योनीत जन्म घ्यावा लागेल आणि किती वेळा जन्मावे-मरावे लागेल. म्हणून मला संग्रह आणि सुखभोगासाठी नव-नवीन कर्मांचा आरंभ करावयाचा नाही, तर प्राप्त परिस्थितीनुसार अनासक्तभावनेने कर्तव्यकर्म करावयाचे आहे. अशा विचारानेही साधक कर्मासक्तीतून मुक्त होतो.

**परिशिष्ट भाव**—रजोगुण कर्मांच्या संगाने मनुष्याला बंधनात टाकतो. म्हणून सात्त्विक कर्मसुद्धा संग झाल्याने बांधणारे होतात. जर संग झाला नसेल तर कर्म बंधनकारक होत नाहीत. (गीता अठराव्या अध्यायाचा सतरावा श्लोक). म्हणून कर्मयोगाने मुक्ती प्राप्त होते. कारण कर्मांचा आणि त्यांच्या फलाचा संग न झाल्यानेच कर्मयोग होतो (गीता सहाव्या अध्यायाचा चवथा श्लोक).

*संबंध—तमोगुणाचे स्वरूप आणि त्याच्या बांधण्याचा प्रकार कोणता आहे—हे पुढील श्लोकात सांगत आहेत.*

**तमस्त्वज्ञानजं विद्धि मोहनं सर्वदेहिनाम्।**
**प्रमादालस्यनिद्राभिस्तन्निबध्नाति भारत॥८॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **तु** | = आणि | **तमः** | = तमोगुण (तू) | **प्रमादालस्य-** | = प्रमाद, आळस आणि |
| **भारत** | = हे भरतवंशी अर्जुन! | **अज्ञानजम्** | = अज्ञानापासून उत्पन्न होणारा | **निद्राभिः** | निद्राद्वारा |
| **सर्वदेहिनाम्** | = संपूर्ण देहधाऱ्यांना | **विद्धि** | = समज. | **निबध्नाति** | = (देहाशी आपला संबंध मानणाऱ्यांना) बांधतो. |
| **मोहनम्** | = मोहित करणारा | **तत्** | = तो | | |

*व्याख्या*—**तमस्त्वज्ञानजं विद्धि मोहनं सर्वदेहिनाम्**—सत्त्वगुण आणि रजोगुण या दोघापेक्षा तमोगुण अत्यंत निकृष्ट दाखविण्यासाठी येथे "**तु**" पदाचा प्रयोग झाला आहे.

हा तमोगुण अज्ञानाने अर्थात् बेसमजेने, मूर्खतेने उत्पन्न होतो आणि संपूर्ण देहधाऱ्यांना मोहित करून टाकतो अर्थात् सत्-असत्, कर्तव्य-अकर्तव्याचे ज्ञान (विवेक) होऊ देत नाही. एवढेच नव्हे तर हा सांसारिक सुखभोग आणि संग्रहातही प्रवृत्त होऊ देत नाही. अर्थात् राजस सुखाचाही लाभ घेऊ देत नाही मग सात्त्विक सुखाची गोष्ट तर विचारायलाच नको.

वास्तविक तमोगुणाने मोहित होण्याची गोष्ट केवळ मनुष्यांसाठीच आहे कारण दुसरे प्राणी तर स्वाभाविकच तमोगुणाने मोहित आहेत. तरीपण येथे "**सर्वदेहिनाम्**" पद देण्याचे तात्पर्य ज्या माणसांच्या ठिकाणी सत्-असत्, कर्तव्य-अकर्तव्याचे ज्ञान (विवेक) नसते, ती माणसे असूनही चौऱ्यांशी लाख योनीत असणाऱ्या प्राण्यांसारखीच आहेत, अर्थात् जसे पशु-पक्षी इत्यादी खाणे-पिणे, झोपणे याचा व्यवहार करतात तशीच ही माणसे आहेत.

**प्रमादालस्यनिद्राभिस्तन्निबध्नाति भारत**—हा तमोगुण

प्रमाद, आळस आणि झोप ह्याद्वारा संपूर्ण देहधाऱ्यांना बांधतो.

"**प्रमाद**" दोन प्रकारचा असतो (१) करण्यास योग्य असे काम न करणे अर्थात् ज्या कामाने आपले आणि जगाचे आत्ता व पुढे हित होणारे आहे, अशी कर्तव्यकर्मे प्रमादामुळे न करणे आणि (२) न करण्यालायक काम करणे अर्थात् ज्या कामाने आपले आणि जगाचे, आत्ता व पुढे अहित होणारे आहे, अशी कर्मे करणे.

न करण्यालायक कामही दोन प्रकारचे असते. (१) व्यर्थ खर्च करणे अर्थात् बिडी-सिगारेट, भांग-गांजा इत्यादी पिण्यात आणि नाटक-सिनेमा, खेळ इत्यादी पाहण्यात पैसा खर्च करणे आणि (२) व्यर्थ क्रिया करणे अर्थात् पत्ते-जुगार खेळणे, विनाकारण पशु-पक्ष्यांना दुःख देणे, त्रास देणे, स्वार्थाविना लहान मोठी झाडे उपटणे इत्यादी व्यर्थ क्रिया करणे.

"**आळस**" ही दोन प्रकारचा असतो. (१) झोपून राहणे, रिकामे बसून राहणे, आवश्यक काम न करणे, त्याला पुढे ढकलणे. अशा प्रकारे आळस मनुष्याला बांधत असतो आणि (२) झोपेपूर्वी शरीर भारी होणे, वृत्ती जड पडणे, समजून घेण्याची शक्ती न राहणे—या प्रकारचा आळस दोषी नाही, कारण हा आळस येत असतो, मनुष्य करीत नाही.

"**झोप**" ही दोन प्रकारची असते (१) आवश्यक झोप—जी झोप शरीराच्या स्वास्थ्यासाठी नियमितरूपाने घेतली जाते आणि ज्यामुळे शरीरात तरतरी येते, वृत्ती निर्मळ होतांत, बुद्धीला विश्राम मिळतो. अशी आवश्यक झोप त्याज्य आणि दोषी नाही. भगवंतांनीही अशा नियमित झोपेला दोषी मानलेले नाही, तर योग साधनेत सहायक मानले आहे. "**युक्तस्वप्नावबोधस्य**" (६।१७) आणि (२) अनावश्यक झोप—जी झोप झोपेसाठीच घेतली जाते, जिने शरीर जड पडते, अधिक बेहोशी येते, झोपेतून उठल्यावरही शरीर जड पडते, वृत्ती जड पडते, मागील स्मृती राहत नाही. अशी अनावश्यक झोप त्याज्य आणि दोषी आहे. ह्या अनावश्यक निद्रेला भगवंतानीही त्याज्य म्हटले आहे "**न चाति स्वप्नशीलस्य**" (६।१६)

अशा प्रकारे तमोगुण हा प्रमाद, आळस आणि निद्रा ह्याद्वारा मनुष्याला बंधनात टाकतो अर्थात् त्याची सांसारिक आणि पारमार्थिक उन्नती होऊ देत नाही.

### विशेष विचार

सत्त्व, रज आणि तम. हे तीन गुण मनुष्याला बांधतात, परंतु या तिघांनी बांधण्याच्या प्रकारात फरक आहे. सत्त्वगुण आणि रजोगुण संगाने बांधतात अर्थात् सत्त्वगुण सुखं आणि ज्ञाना याच्या आसक्तीने बांधतो. तसेच रजोगुण कर्माच्या आसक्तीने बांधतो. म्हणून सत्त्वगुणात "सुखसंग आणि ज्ञानसंग" सांगितले तसेच रजोगुणात "कर्मसंग" सांगितला. परंतु तमोगुणात "संग" सांगितला नाही. कारण तमोगुण मोहनात्मक आहे. यात कोणाचा संग करण्याची आवश्यकता राहत नाही. हा तर स्वरूपानेच बांधणारा आहे. तात्पर्य सत्त्वगुण आणि रजोगुण तर संगाने (सुखासक्ती) बांधतो परंतु तमोगुण स्वरूपानेच बांधणारा आहे.

जर सुखाची आसक्ती नसेल आणि ज्ञानाचा अभिमान नसेल तर सुख आणि ज्ञान बांधणारे होणार नाहीत, तर गुणातीत करणारे होतात. त्याचप्रमाणे कर्म आणि कर्मफलात आसक्ती नसेल, तर ते कर्म परमात्मतत्त्वाची प्राप्ती करविणारे होते. (३।१९)

उपर्युक्त तिन्ही गुण प्रकृतीचे कार्य आहे आणि जीव स्वतः प्रकृती आणि त्याचे कार्य गुणांपासून सर्वथा रहित आहे. गुणांशी संबंध जोडल्यामुळेच तो स्वतः निर्लिप्त, गुणातीत असूनही गुणांद्वारा बांधला जातो. म्हणून आपल्या वास्तविक स्वरूपाचे ध्येय निश्चित केल्यानेच साधक गुणांच्या बंधनातून मुक्त होऊ शकतो.

*संबंध—बांधण्यापूर्वी तिन्ही गुण काय करीत असतात—हे पुढील श्लोकात सांगतात.*

**सत्त्वं सुखे सञ्जयति रजः कर्मणि भारत।**
**ज्ञानमावृत्य तु तमः प्रमादे सञ्जयत्युत॥ ९ ॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **भारत** | = हे भरतवंशी अर्जुन! | | (मनुष्यावर) | **आवृत्य** | = झाकून |
| **सत्त्वम्** | = सत्त्वगुण | **सञ्जयति** | = विजय मिळवितात. | **उत** | = आणि |
| **सुखे** | = सुखात (आणि) | **तु** | = परंतु | **प्रमादे** | = प्रमादात लावून (मनुष्यावर) |
| **रजः** | = रजोगुण | **तमः** | = तमोगुण | | |
| **कर्मणि** | = कर्मात लावून | **ज्ञानम्** | = ज्ञानाला | **सञ्जयति** | = विजय मिळवितो. |

***व्याख्या— सत्त्वं सुखे सञ्जयति***—सत्त्वगुण साधकाला सुखात प्रवृत्त करून त्यावर विजय मिळवितो, साधकाला आपल्या वश करतो. तात्पर्य जेव्हा सात्त्विक सुख प्राप्त होते तेव्हा साधकाची त्या सुखात आसक्ती होते. सुखाविषयी

आसक्ती झाल्याने ते सुख साधकाला बांधून टाकते. अर्थात् त्याच्या साधनेची प्रगती होऊ देत नाही, म्हणून साधक सत्त्वगुणापासून उन्नत होऊ शकत नाही. गुणातीत होऊ शकत नाही.

जरी भगवंतांनी पूर्वी सहाव्या श्लोकात सत्त्वगुणाद्वारा होणाऱ्या सुखाच्या आणि ज्ञानाच्या संगामुळे बांधण्याविषयी सांगितले, तरीही येथे सत्त्वगुणाचा विजय केवळ सुखातच दाखविला आहे, ज्ञानात नव्हे. याचे तात्पर्य वास्तविक साधक सुखाच्या आसक्तीनेच बांधला जातो. ज्ञान झाल्यावर साधकात एक प्रकारचा अभिमान उत्पन्न होतो की, "मी किती मोठा ज्ञानी आहे" या आभिमानातही एक प्रकारचे सुख मिळत असते, ज्यामुळे साधक बंधनात सांपडतो. म्हणून येथे केवळ सुखातच विजय दाखविला आहे.

**रजः कर्मणि भारत**—रजोगुण मनुष्याला कर्मामध्ये प्रवृत्त करून त्यावर विजय मिळवितो. तात्पर्य मनुष्याला क्रिया करणे आवडते, चांगले वाटते. जसे लहान बालकाला हात पाय हलविण्यात आनंद वाटतो आणि त्याचे हात पाय हलविणे बंद केले तर ते रडू लागते, तसेच मनुष्य एखादी क्रिया करत असेल तर त्याला चांगले वाटते आणि मध्येच कोणी ती क्रिया सोडवली तर त्याला दुःख होते. हीच क्रियेविषयी आसक्ती आहे, प्रियता आहे, ज्यामुळे रजोगुण मनुष्यावर विजय मिळवितो.

"कर्माच्या फलामध्ये तुझा अधिकार नाही" (२।४७) इत्यादी वचनांनी फलात आसक्ती न ठेवण्याकडे तर साधकाचे लक्ष जाते परंतु कर्मांमध्ये आसक्ती न करण्याकडे साधकाचे लक्ष राहत नाही. तो तर "तुझा कर्म करण्यातच अधिकार आहे, कर्म न करण्यात तुझी आसक्ती होऊ नये" (२।४७) "जो योगारूढ होऊ इच्छितो त्याने निष्काम- भावाने कर्म करणे कारण आहे" (६।३) इत्यादी वचनांनी असे समजतो की, कर्म तर केलेच पाहिजे. म्हणून तो कर्म करतो आणि ते कर्म करता करता त्याची त्या कर्मांविषयी आसक्ती, प्रियता होते, त्यांचा आग्रह होतो. याकडे लक्ष वेधण्यासाठी, जागृत करण्यासाठी भगवान् येथे म्हणतात की, रजोगुण कर्मांमध्ये प्रवृत्त करून विजय मिळवितो अर्थात् कर्मांविषयी आसक्ती उत्पन्न करून बांधून टाकतो. म्हणून साधक कर्तव्यकर्म करण्यात तर तत्पर असला पाहिजे, परंतु कर्मांविषयी आसक्ती, प्रियता, आग्रह कधी ठेवता कामा नये—"**न कर्मस्वनुषज्जते**" (६।४)

**ज्ञानमावृत्य तु तमः प्रमादे सञ्जयत्युत**—जेव्हा तमोगुण येतो, तेव्हा तो सत्-असत्, कर्तव्य-अकर्तव्य, हित-अहिताच्या ज्ञानाला (विवेक) झाकून टाकतो, आच्छादित करतो अर्थात् त्या ज्ञानाला जागृत होऊ देत नाही. ज्ञानाला झाकून तो मनुष्याला प्रमादाकडे प्रवृत्त करतो अर्थात् कर्तव्यकर्म करू देत नाही आणि न करण्यालायक कर्मात प्रवृत्त करतो. हेच त्याचे विजयी होणे आहे.

सत्त्वगुणाने ज्ञान (विवेक) आणि प्रकाश (स्वच्छता) ह्या दोन वृत्ती उत्पन्न होतात. तमोगुण ह्या दोन्हीही वृत्तींचा विरोधी आहे, म्हणून तो ज्ञानाला (विवेक) झाकून मनुष्याला प्रमादाकडे वळवितो आणि प्रकाशाला (इंद्रिये आणि अंतः-करणाची शुद्धता) झाकून मनुष्याला आळस आणि झोपेकडे वळवितो. ज्यामुळे ज्ञानाचा विषय सांगून, ऐकून आणि वाचूनही समजत नाही.

**परिशिष्ट भाव**—सत्त्वगुण केवळ सुख झाल्यास विजय मिळवित नाही, तर सुखाचा संग झाल्यास विजय मिळवितो—'**सुखसङ्गेन बध्नाति**' (गीता १४।६). त्याचप्रमाणे रजोगुणसुद्धा कर्माचा संग झाल्यास विजय मिळवितो—'**तन्निबध्नाति कौन्तेय कर्मसङ्गेन देहिनम्**' (१४।७). परंतु तमोगुण स्वरूपानेच विजय मिळवितो. म्हणून तमोगुणात 'संग' शब्द आला नाही.

'मी सुखी आहे'—हा सुखाचा संग आहे आणि 'मी उत्तम कर्म करणारा आहे, माझे कर्म फार चांगले आहेत'—हा कर्माचा संग आहे. संग करण्याने अर्थात् आपला संबंध जोडल्यानेच मनुष्य बांधनात सापडतो.

***संबंध**—एक एक गुण मनुष्यावर कसा विजय मिळवतो—हे पुढील श्लोकात सांगत आहेत.*

## रजस्तमश्चाभिभूय सत्त्वं भवति भारत।
## रजः सत्त्वं तमश्चैव तमः सत्त्वं रजस्तथा॥ १०॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **भारत** | = हे भरतवंशोद्भव अर्जुन! | **सत्त्वम्** | = सत्त्वगुण | **रजः** | = रजोगुण (वाढतो) |
| **रजः** | = रजोगुण | **भवति** | = वाढतो, | **तथा, एव** | = तसेच |
| **च** | = आणि | **सत्त्वम्** | = सत्त्वगुण | **सत्त्वम्** | = सत्त्वगुण (आणि) |
| **तमः** | = तमोगुणाला | **च** | = आणि | **रजः** | = रजोगुणाला (दाबून) |
| **अभिभूय** | = दाबून | **तमः** | = तमोगुणाला (दाबून) | **तमः** | = तमोगुण (वाढतो) |

***व्याख्या*— रजस्तमश्चाभिभूय सत्त्वं भवति भारत**— रजोगुणाच्या आणि तमोगुणाच्या वृत्तींना दाबून सत्त्वगुण वाढतो अर्थात् रजोगुणाच्या लोभ, प्रवृत्ती, नव-नवीन कर्मांचा आरंभ अशांती, स्पृहा, सांसारिक भोग आणि संग्राहामध्ये प्रियता इत्यादी वृत्तीं आणि तमोगुणाच्या प्रमाद, आळस, अनावश्यक झोप, मूढता इत्यादी वृत्तीं—या सर्वांना ''सत्त्वगुण'' दाबून टाकतो आणि अंतःकरणात स्वच्छता, निर्मळता, वैराग्य, निस्पृहता, उदारता, निवृत्ती इत्यादी वृत्ती उत्पन्न करतो.

**रजः सत्त्वं तमश्चैव**—सत्त्वगुणाच्या आणि तमोगुणाच्या वृत्तींना दाबून रजोगुण वाढतो. अर्थात् सत्त्वगुणाच्या ज्ञान, प्रकाश, वैराग्य उदारता इत्यादी वृत्ती आणि तमोगुणाच्या प्रमाद, आळस, अनावश्यक निद्रा, मूढता इत्यादी वृत्ती—या सर्वांना ''रजोगुण'' दाबून टाकतो आणि अंतःकरणामध्ये लोभ, प्रवृत्ती, आरंभ, अशांती, स्पृहा इत्यादी वृत्तींना उत्पन्न करतो.

**तमः सत्त्वं रजस्तथा**—तसाच सत्त्वगुण आणि रजोगुणाला दाबून तमोगुण वाढतो, अर्थात् सत्त्वगुणांच्या स्वच्छता, निर्मळता, प्रकाश, उदारता इत्यादी वृत्ती आणि रजोगुणाच्या चंचलता, अशांती, लोभ, इत्यादी वृत्ती—या सर्वांना ''तमोगुण'' दाबून टाकतो आणि अंतःकरणात प्रमाद, आळस, अतिनिद्रा, मूढता इत्यादी वृत्तींना उत्पन्न करतो.

दोन गुणांना दाबून एक गुण वाढतो, वाढलेला गुण मनुष्यावर विजय मिळवितो आणि विजय मिळवून मनुष्याला बंधनात टाकतो. परंतु भगवंतांनी येथे (सहाव्यापासून दहाव्या श्लोकापर्यंत) उलटा क्रम दिला आहे अर्थात् प्रथम बंधनात टाकण्याविषयी सांगितले नंतर विजय मिळविण्यासंबंधी म्हटले आणि त्यानंतर दोन गुणांना दाबून एक गुण वाढत असल्याचे सांगितले. असा क्रम देण्याचे तात्पर्य पूर्वी दुसऱ्या श्लेकात सांगितले की, ज्या महापुरुषांचा प्रकृतीशी संबंध-विच्छेद झालेला आहे ते, महासर्गातही उत्पन्न होत नाहीत आणि प्रलयातही व्यथित होत नाहीत. कारण महासर्ग आणि महाप्रलय दोन्ही प्रकृतीच्या संबंधानेच होतात. परंतु जी माणसे प्रकृतीशी संबंध जोडून घेतात त्यांना प्रकृतिजन्य गुण बांधून टाकतात (१४।५). यावर स्वाभाविक असा प्रश्न होतो की, त्या गुणांचे स्वरूप काय आहे आणि ते गुण मनुष्यांना कशा रीतीने बंधनात टाकतात? याच्या उत्तरात भगवंतांनी सहाव्यापासून आठव्या श्लोकापर्यंत क्रमाने सत्त्व, रज आणि तम—तिन्ही गुणांचे स्वरूप आणि त्यांच्याकडून जीवाला बांधले जाण्याचा प्रकार सांगितला. यावर प्रश्न होतो की, बांधण्यापूर्वी तिन्ही गुण काय करत असतात? याच्या उत्तरात भगवंतांनी सांगितले की, बांधण्यापूर्वी वाढलेला गुण मनुष्यावर विजय मिळवितो, तेव्हा त्याला बांधून टाकतो. (१४।९) आता प्रश्न होतो की, गुण मनुष्यावर कसा विजय मिळवितो? याच्या उत्तरात भगवंतांनी म्हटले की, दोन गुणांना दाबून एक गुण मनुष्यावर विजय मिळवितो (१४।१०) अशा प्रकारे विचार केल्यास असे वाटते की, भगवंतांनी सहाव्यापासून दहाव्या श्लोकापर्यंत जो क्रम ठेवला आहे तो योग्यच आहे.

**परिशिष्ट भाव**—जो गुण वाढतो त्याचे प्राधान्य राहते आणि दुसऱ्या गुणांची गौणता होते. हा गुणांचा स्वभाव आहे.

***संबंध*—*जेव्हा दोन गुणांना दाबून एक गुण वाढतो, तेव्हा त्या वाढलेल्या गुणाची कोणती लक्षणे असतात—हे सांगण्यासाठी प्रथम वाढलेल्या सत्त्वगुणाच्या लक्षणांचे वर्णन करीत आहेत.***

**सर्वद्वारेषु देहेऽस्मिन्प्रकाश उपजायते।**
**ज्ञानं यदा तदा विद्याद्विवृद्धं सत्त्वमित्युत॥ ११ ॥**

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| **यदा** | = | जेव्हा | | | अंतःकरण यांत) | **तदा** | = | तेव्हा |
| **अस्मिन्** | = | त्या | **प्रकाशः** | = | प्रकाश (स्वच्छता) | **इति** | = | असे |
| **देहे** | = | मनुष्यशरीरातील | **उत** | = | आणि | **विद्यात्** | = | जाणावे (की,) |
| **सर्वद्वारेषु** | = | सर्व द्वारांत | **ज्ञानम्** | = | विवेक | **सत्त्वम्** | = | सत्त्वगुण |
| | | (इंद्रिये आणि | **उपजायते** | = | प्रगट होतो, | **विवृद्धम्** | = | वाढला आहे. |

***व्याख्या*—सर्वद्वारेषु देहेऽस्मिन्......ज्ञानं यदा**— ज्यावेळी रजोगुणी आणि तमोगुणी वृत्तींना दाबून सत्त्वगुण वाढतो, त्यावेळी संपूर्ण इंद्रियांमध्ये तसेच अंतःकरणात स्वच्छता, निर्मळता उत्पन्न होते. जसे सूर्याच्या प्रकाशामध्ये सर्व वस्तू स्पष्ट दिसतात, तसेच स्वच्छ बहिःकरण आणि अंतःकरणाने शब्दादी पाचही विषयांचे यथार्थरूपाने ज्ञान होते. मनाने कोणत्याही विषयाचे योग्य मनन-चिंतन होते.

इंद्रियांत आणि अंतःकरणात स्वच्छता, निर्मळता आल्याने

"सत् काय आहे आणि असत् काय आहे, ? कर्तव्य काय आहे आणि अकर्तव्य काय आहे ? हित कशात आहे आणि अहित कशात आहे ?" इत्यादी विषयांचे स्पष्ट ज्ञान (विवेक) होते.

येथे "**देहेऽस्मिन्**" म्हणण्याचे तात्पर्य हे आहे की, सत्त्वगुण वाढण्याचा अर्थात् बहि:करण आणि अंत:करणामध्ये स्वच्छता, निर्मळता आणि विवेकशक्ती उत्पन्न होण्याचा अवसर या शरीरातच आहे, इतर शरीरात नाही. भगवंतांनी तमोगुणाने बांधले जाणाऱ्यासाठी "**सर्वदेहिनाम्**" (१४।८) पदाचा प्रयोग केला आहे, ज्याचे तात्पर्य रजोगुण, तमोगुण तर इतर शरीरातही वाढतात, परंतु सत्त्वगुण मनुष्य शरीरातच वाढू शकतो. म्हणून मनुष्याने रजोगुण आणि तमोगुणावर विजय मिळवून सत्त्वगुणाच्याही पलीकडे जावे. यातच मनुष्य जीवनाची सफलता आहे. भगवंतांनी कृपा करून मनुष्यशरीर देऊन या तिन्ही गुणांवर विजय प्राप्त करण्याचा पूर्ण अवसर, अधिकार, योग्यता, सामर्थ्य, स्वतंत्रता दिली आहे.

**तदा विद्याद् विवृद्धं सत्त्वमित्युत**—इंद्रियात आणि अंत:करणात स्वच्छता आणि विवेकशक्ती आल्यास साधकाने हे समजून घ्यावे की, यावेळी सत्त्वगुणाची वृत्ती वाढलेली आहे आणि रजोगुण-तमोगुणाच्या वृत्ती दबल्या गेल्या आहेत. म्हणून साधकाने कधीही आपल्यामध्ये असा अभिमान करू नये, "मी ज्ञानी झालो, मी जाणकार झालो" अर्थात् ते सत्त्वगुणाचेच कार्य व लक्षण समजावे.

येथे "**इति विद्यात्**" पदांचे तात्पर्य तिन्ही गुणांच्या वृत्ती उत्पन्न होणे, वाढणे आणि एका गुणाची प्रधानता झाल्यावर दुसऱ्या दोन गुणांचे दबणे, इत्यादी इत्यादी परिवर्तन गुणांतच होत असते, स्वरूपात नव्हे. ही गोष्ट मनुष्यशरीरातच योग्य रीतीने समजून घेतली जाऊ शकते. परंतु मनुष्य भगवंतांनी प्रदान केलेल्या विवेकाला महत्त्व न देता गुणांशी संबंध जोडून घेतो आणि स्वत:ला सात्त्विक, राजस अथवा तामस समजू लागतो. मनुष्याने स्वत:ला असे न समजता, संपूर्णपणे निर्विकार अपरिर्वतशील समजावे.

तिन्ही गुणांच्या वृत्ती वेगवेगळ्या निर्माण होतात आणि समाप्त होतात, याचा सर्वांना अनुभव आहे. स्व परिवर्तनरहित आणि या सर्व वृत्तींना पाहणारा आहे. जर स्व- ही बदलणारा असता तर या वृत्तींच्या निर्मिती आणि समाप्तीला कोणी पाहिले असते ? परिवर्तनाला परिवर्तनरहितच जाणू शकतो.

जेव्हा सात्त्विक वृत्तींच्या वाढण्याने इंद्रिये आणि अंत:करणात स्वच्छता आणि निर्मळता निर्माण होते आणि विवेक जागृत होतो, तेव्हा संसाराची आसक्ती समाप्त होते आणि वैराग्य प्राप्त होते. अशांती समाप्त होते आणि शांती प्राप्त होते. लोभ समाप्त होतो आणि उदारता प्राप्त होते. प्रवृत्ती निष्कामभावपूर्वक होऊ लागते (१८। ९). भोग आणि संग्रहासाठी नव-नवीन कर्मांचा आरंभ होत नाही. मनात पदार्थ, भोगांची आवश्यकता उत्पन्न होत नाही, तर केवळ निर्वाहमात्राची दृष्टी राहते. प्रत्येक विषय समजून घेण्यासाठी बुद्धीचा विकास होतो. प्रत्येक कार्य सावधानीपूर्वक आणि उत्तम रीतीने होते. कार्यात चुका कमी होतात. यदाकदाचित काही चुका झाल्या तरी त्यांचा सुधार होतो, बेपरवाई राहत नाही. सत्-असत्, कर्तव्य-अकर्तव्याचा विवेक स्पष्टपणे जागृत राहतो. म्हणून ज्यावेळी सात्त्विक वृत्ती वाढल्या असतील तर त्यावेळी साधकाने विशेषरूपाने भजन-ध्यान इत्यादीमध्ये तत्पर रहावे. अशावेळी केल्या गेलेल्या थोड्याशा साधनानेही शीघ्रच पुष्कळ लाभ होऊ शकतो.

**परिशिष्ट भाव**—'प्रकाश' आणि 'ज्ञान' दोन्हीत फरक आहे. 'प्रकाश' याचा अर्थ आहे—इंद्रिये आणि अंत:करणात जागृती अर्थात् रजोगुणापासून होणाऱ्या मनोराज्याचे आणि तमोगुणापासून होणारे निद्रा, आळस व प्रमाद यांचे न होणे हेच स्वच्छता होणे आहे. 'ज्ञान' याचा अर्थ आहे—विवेक अर्थात् सत्, असत्, कर्तव्य-अकर्तव्य, नित्य-अनित्य, ग्राह्य-त्याज्य इत्यादीचे ज्ञान होणे.

***संबंध***—*वाढलेल्या रजोगुणाची कोणती लक्षणे असतात हे पुढील श्लोकात सांगतात.*

**लोभः प्रवृत्तिरारम्भः कर्मणामशमः स्पृहा।**
**रजस्येतानि जायन्ते विवृद्धे भरतर्षभ॥ १२॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **भरतर्षभ** | = हे भरतवंशात श्रेष्ठ अर्जुन! | **लोभः** | = लोभ, | **अशमः** | = अशांती (आणि) |
| **रजसि** | = रजोगुण | **प्रवत्तिः** | = प्रवत्ती, | **स्पृहा** | = स्पृहा— |
| **विवृद्धे** | = वाढल्यावर | **कर्मणाम्** | = कर्मांचा | **एतानि** | = ह्या वृत्ती |
| | | **आरम्भ** | = आरंभ, | **जायन्ते** | = उत्पन्न होतात. |

*व्याख्या*— **लोभः**—निर्वाहाच्या वस्तू जवळ असल्या तरीही त्यांना अधिक वाढविण्याच्या इच्छेचे नाव ''लोभ'' आहे. परंतु त्या वस्तूंच्या स्वाभाविक वाढीला लोभ म्हणत नाहीत. जसे एखादा शेती व्यवसाय करतो आणि अधिक धान्य पिकले, कोणी व्यापार करतो, त्याला जास्त नफा झाला तर अशा रीतीने पदार्थ, धन इत्यादीच्या स्वाभाविक वाढीचे नाव लोभ नाही आणि अशी वाढ दोषावहही ठरत नाही.

**प्रवृत्तिः**—सर्व कार्यामध्येच मग्न असण्याचे नाव प्रवृत्ती आहे. परंतु राग-द्वेषरहित होऊन कार्यात मग्न होणे हा दोष नाही. कारण अशी प्रवृत्ती तर गुणातीत महापुरुषामध्येही होत असते (१४। २२) आसक्तिपूर्वक अर्थात् सुख, आराम, धन इत्यादींच्या इच्छेने क्रियेत प्रवृत्त होणे हाच दोष आहे.

**आरम्भः कर्मणाम्**—जगात श्रीमंत आणि मोठे म्हणवून घेण्यासाठी मान, आदर, प्रशंसा, इत्यादी मिळविण्यासाठी नव-नवीन कर्म करणे, नव-नवीन व्यापार सुरू करणे, नव-नवीन कारखाने उभारणे, नव-नवीन दुकाने चालू करणे इत्यादी ''कर्मांचा आरम्भ'' आहे.

प्रवृत्ती आणि आरंभ या दोन्हीत अंतर आहे. परिस्थिती-नुसार एखाद्या कार्यात प्रवृत्ती होत असते आणि एखाद्या कार्यापासून निवृत्ती होत असते. परंतु भोग आणि संग्रह यांच्या उद्देशाने नव-नवीन कर्मांना सुरू करणे ''आरम्भ'' आहे.

मनुष्यजन्म प्राप्त झाल्यावर केवळ परमात्मतत्त्वप्राप्तीचा उद्देश रहावा, भोग आणि संग्रहाचा उद्देश मुळीच नसावा. याच दृष्टीने भक्तियोग आणि ज्ञानयोगात ''**सर्वारम्भपरित्यागी**'' (१२।१६, १४।२५) पदाने संपूर्ण आरम्भांचा त्याग करण्यासाठी सांगितले गेले आहे. कर्मयोगात कर्मारंभ तर होतात, परंतु ते सर्वच आरंभ कामना आणि संकल्परहित असतात (४। १९). कर्मयोगात असे आरंभ दोषीही नसतात कारण कर्मयोगात कर्म करण्याचे विधान असते आणि कर्म केल्याविना कर्मयोगी योगारूढ (समता) होऊ शकत नाही. (६।३). म्हणून आसक्तिरहित होऊन प्राप्त परिस्थितीनुसार कर्मांचे आरंभ केले गेले तर ते आरंभ, आरंभ होत नाहीत, तर केवळ प्रवृत्तीच राहते, कारण त्यापासून कर्म करण्याची आसक्ती समाप्त होत असते. ते आरंभ निवृत्ती करविणारे असल्याने दोषी नाहीत.

**अशमः**—अंतःकरणात अशांती, चलबिचल राहण्याचे नाव ''अशम'' आहे. जशी इच्छा करतात तशा वस्तू (धन, संपत्ती, यश, प्रतिष्ठा इत्यादी) जेव्हा मिळत नाहीत, तेव्हा अंतःकरणात अशांती, चलबिचल होत असते. कामनेचा त्याग केल्यावर, ही अशांती राहत नाही.

**स्पृहा**—शरीराच्या स्वाभाविक आवश्यकते संबंधी निर्माण होणाऱ्या वृत्तीचे नाव ''स्पृहा'' आहे. जसे भूक लागल्यावर अन्नाची, तहान लागली असता पाण्याची, थंडीत गरम कपड्याची, आवश्यकता वाटत असते. वास्तविक भूक, तहान आणि थंडी यांचे ज्ञान होणे दोष नाही, तर अन्न, पाणी इत्यादी मिळावे अशी इच्छा करणे हाच दोष आहे. साधकाने या इच्छेचा त्याग करावा, कारण कोणतीही वस्तू इच्छेच्या अधीन नसते.

**रजस्येतानि जायन्ते विवृद्धे भरतर्षभ**—जेव्हा अंतः-करणात रजोगुण वाढतो, तेव्हा उपर्युक्त लोभ, प्रवृत्ती इत्यादी वृत्ती वाढतात. अशा वेळी साधकांनी असा विचार करावा की, आपला जीवननिर्वाह तर होतच आहे तर मग आपल्याला आणखी काय पाहिजे? असा विचार करून रजोगुणाच्या वृत्तींना समाप्त करून टाकावे, त्यापासून उदासीन व्हावे.

**परिशिष्ट भाव**—रजोगुण वाढल्यास सत्त्वगुणाचा प्रकाश आणि ज्ञान दबून जातात. रजोगुण असंगतेचा विरोधी आहे—'**रजो रागात्मकं विद्धी**' (गीता १४। ७). क्रिया आणि पदार्थाचा संग केल्यामुळे तो मनुष्याला योगारूढ होऊ देत नाही. कारण मनुष्य क्रिया आणि पदार्थापासून असंग झाल्यावरच योगारूढ होतो (गीता सहाव्या अध्यायाचा चवथा श्लोक).

***संबंध**—वाढलेल्या तमोगुणाची कोणती लक्षणे असतात—हे पुढील श्लोकात सांगतात.*

**अप्रकाशोऽप्रवृत्तिश्च प्रमादो मोह एव च।**
**तमस्येतानि जायन्ते विवृद्धे कुरुनन्दन॥ १३॥**

| | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| **कुरुनन्दन** | = | हे कुरुनंदन! | **अप्रकाशः** | = | अप्रकाश, | **च** | = | आणि |
| **तमसि** | = | तमोगुण | **अप्रवृत्तिः** | = | अप्रवृत्ती, | **मोहः** | = | मोह |
| **विवृद्धे** | = | वाढला असताना | **च** | = | तसेच | **एतानि एव** | = | ह्या वृत्तींही |
| | | | **प्रमादः** | = | प्रमाद | **जायन्ते** | = | उत्पन्न होतात. |

*व्याख्या*— **अप्रकाशः**—सत्त्वगुणाच्या प्रकाश (स्वच्छता) ह्या वृत्तीला दाबून जेव्हा तमोगुण वाढतो, तेव्हा इंद्रिये आणि अंतःकरण ह्यामध्ये स्वच्छता राहत नाही. इंद्रिये आणि अंतः-करण ह्यात जी समजून घेण्याची शक्ती असते, ती तमोगुण

वाढल्यावर लुप्त होत असते अर्थात् मागील विषय तर लक्षात राहत नाही आणि नवीन विवेक उत्पन्न होत नाही. या वृत्तीला येथे ''अप्रकाश'' असे म्हणून हिचा सत्त्वगुणाच्या ''प्रकाश'' वृतीशी विरोध दाखविला गेला आहे.

**अप्रवृत्तिः**—रजोगुणाची वृत्ती ''प्रवृत्ती'' हिला दाबून जेव्हा तमोगुण वाढतो, तेव्हा मनाला कार्य करण्याची इच्छा होत नाही. निरर्थक बसून रहावे अथवा पडून रहावेसे वाटते. आवश्यक कार्यही करण्याची इच्छा होत नाही. ह्या सर्व वृत्तीला ''अप्रवृत्ती'' म्हणतात.

**प्रमादः**—न करण्यालायक कार्य करण्यात प्रवृत्त होणे आणि करण्यायोग्य काम न करणे, तसेच ज्या कार्यांना करण्याने पारमार्थिक उन्नती होत नाही, सांसारिक उत्कर्ष होत नाही, समाजाचे एखादे कार्य सिद्ध होत नाही आणि जे शरीरासाठीही आवश्यक नसते. जसे बीडी-सिगारेट ओढणे, पत्ते-जुगार खेळणे, तमाशे-सिनेमा पाहणे इत्यादी कार्यात लागणे ''प्रमाद'' या वृत्तीचे काम आहे.

**मोहः**—तमोगुण वाढल्यावर जेव्हा ''मोह'' वृत्ती निर्माण होते, तेव्हा अंत:करणात विवेक विरोधी भाव उत्पन्न होऊ लागतात. क्रिया करणे अथवा न करणेविषयी विवेक काम करीत नाही, तर मूढता पसरलेली असते, ज्यामुळे पारमार्थिक आणि व्यावहारिक काम करण्याचे सामर्थ्य राहत नाही.

**एव च**—या पदांनी अधिक झोप घेणे, आपल्या जीवनाचा काळ निरर्थक नष्ट करणे, धन निरर्थक नष्ट करणे इत्यादी जितकी निरर्थक कार्य आहेत त्या सर्वांना यात घेतले पाहिजे.

**तमस्येतानि जायन्ते विवृद्धे कुरुनन्दन**—ही सर्व वाढलेल्या तमोगुणाची लक्षणे आहेत, अर्थात् जेव्हा हे अप्रकाश, अप्रवृत्ती इत्यादी दिसू लागतील, तेव्हा सत्त्वगुणाला आणि रजोगुणाला दाबून तमोगुण वाढला आहे असे समजावे.

सत्त्व, रज आणि तम हे तिन्हीही गुण सूक्ष्म असल्याने अतींद्रिय आहेत अर्थात् इंद्रिये आणि अंत:करणाचे विषय नाहीत. म्हणून हे तिन्ही गुण प्रत्यक्ष दिसत नाहीत, यांच्या स्वरूपाचे प्रत्यक्ष ज्ञान होत नाही. या गुणांचे ज्ञान, यांची ओळख तर वृत्तींनीच होत असते, कारण वृत्ती स्थूल असल्याने त्या इंद्रिये आणि अंत:करणाचा विषय होतात. म्हणून भगवंतांनी अकराव्या, बाराव्या आणि तेराव्या श्लोकांत क्रमाने तिन्ही गुणांच्या वृत्तींचेच वर्णन केले आहे, ज्यामुळे अतींद्रिय गुणांची ओळख व्हावी आणि साधकाला सावध होऊन रजोगुण-तमोगुणाचा त्याग करून सत्त्वगुणाची वाढ करणे शक्य व्हावे.

## मार्मिक गोष्ट

सत्त्व, रज आणि तम—तिन्ही गुणांच्या वृत्ती स्वाभाविकच उत्पन्न, नष्ट तसेच कमी अधिक होत राहतात. ह्या सर्व परिवर्तनशील आहेत. साधक आपल्या जीवनात या वृत्तींचा अनुभवही करत असतो. यावरुन सिद्ध होते की, तिन्ही गुणांच्या वृत्ती बदलणाऱ्या आहेत आणि यांच्या परिवर्तनाला जाणणाऱ्या पुरुषात कधी कोणते परिवर्तन होत नाही. तिन्ही गुणांच्या वृत्ती दृश्य आहेत आणि पुरुष यांना पाहणारा असल्याने द्रष्टा आहे. द्रष्टा दृश्याहून संपूर्णपणे वेगळा असतो—हा नियम आहे. दृश्याकडे दृष्टी असल्यानेच द्रष्टा संज्ञा होते. दृश्यावर दृष्टी न राहिल्यास द्रष्टा संज्ञारहित होतो. चूक ही होते की, दृश्याला आपल्यात आरोपित करून तो स्वत:ला ''मी कामी आहे'', ''मी क्रोधी आहे'' इत्यादी समजतो.

काम-क्रोधादी विकारांशी संबंध जोडून त्यांना आपल्यात आरोपित करणे म्हणजे त्या विकारांना आमंत्रण देणे आहे आणि त्यांना स्थायी करणे आहे. क्रोध आला असताना मनुष्य भ्रमाने क्रोधाला उचित समजतो आणि म्हणतो की, क्रोध हा तर सर्वांनाच येत असतो आणि इतर वेळी ''माझा क्रोधी स्वभाव आहे'' असा भाव ठेवतो. अशा प्रकारे ''मी क्रोधी आहे'' असे समजल्याने तो क्रोध अहंतेत कायम होतो. मग क्रोधरूपी विकारापासून सुटका होणे कठीण जाते. म्हणूनच साधक प्रयत्न करूनही क्रोधादी विकारांना दूर करू शकत नाही आणि त्यांच्यापुढे आपला पराभव समजतो.

काम, क्रोधादी विकारांना नाहीसे करण्याचा मुख्य आणि सुगम उपाय हा आहे की, साधकाने यांना कधीही आपल्यात समजूच नये. वास्तविक विकार निरंतर राहत नाहीत, तर विकाररहित अवस्था निरंतर राहत असते, कारण विकार तर येतात आणि जातात, परंतु स्व निरंतर निर्विकार राहत असतो. क्रोधादी विकारही आपल्यात नसतात, मन-बुद्धीत निर्माण होतात. परंतु साधक मन-बुद्धीशी मिसळून त्या विकारांना भ्रमाने आपल्यात समजतो. जर त्याने विकारांना आपल्यात समजले नाही, तर त्यांच्याशी भ्रमाने मानलेला संबंध समाप्त होतो. मग विकारांना नाहीसे करावे लागत नाही, तर ते आपोआपच नाहीसे होतात. जसे क्रोध आला तर साधकाने असा विचार करावा की'' ''मी तर तोच आहे, मी येणाऱ्या-जाणाऱ्या क्रोधाशी कधी मिसळू शकतच नाही.'' असा विचार दृढ झाल्यास क्रोधाचा वेग कमी होईल आणि पूर्वीपेक्षा तो कमी वेळा

निर्माण होईल. शेवटी मग तो संपूर्णपणे नाहीसा होईल.

भगवंत पूर्वोक्त तीन श्लोकात क्रमाने सत्त्वगुण, रजोगुण आणि तमोगुण यांच्या वृद्धीच्या लक्षणांचे वर्णन करून साधकाला सावधान करतात की, गुणांशी आपला संबंध मानल्यानेच गुणांपासून उत्पन्न होणाऱ्या वृत्ती त्याला आपल्यांत प्रतीत होतात. वास्तविक साधकाचा यांच्याशी किंचित्मात्रही संबंध नसतो. गुण आणि गुणांच्या वृत्ती प्रकृतीचे कार्य असल्याने परिवर्तनशील आहेत आणि स्व पुरुष परमात्म्याचा अंश असल्याने अपरिवर्तनशील आहे. प्रकृती आणि पुरुष दोन्ही विजातीय आहेत. बदलणाराशी न बदलणाऱ्याचा एकात्मभाव होऊच कसा शकतो? या वास्तविकतेकडे दृष्टी ठेवल्यास तमोगुण आणि रजोगुण दबतात तसेच साधकाच्या ठिकाणी सत्त्वगुणाची वाढ आपोआप होते. सत्त्वगुणाविषयी भोगबुद्धी झाल्यास अर्थात् त्यापासून होणाऱ्या सुखाविषयी आसक्ती झाल्यास हा सत्त्वगुणही गुणातीत होण्यात बाधा करतो. म्हणून साधकाने सत्त्वगुणापासून उत्पन्न झालेल्या सुखाचाही उपभोग करू नये. सात्त्विक सुखाचा उपभोग करणे रजोगुण-अंश आहे. रजोगुणाविषयी आसक्ती वाढल्यास आसक्तीत बाधा आणणाऱ्याविषयी क्रोध उत्पन्न होऊन सम्मोह होतो आणि आसक्तीनुसार पदार्थ प्राप्त झाल्यास लोभ उत्पन्न होऊन सम्मोह होतो. अशा प्रकारे सम्मोह उत्पन्न झाल्यास साधक रजोगुणातून तमोगुणात प्रवेश करतो आणि त्याचे पतन होते (२।६२-६३).

**परिशिष्ट भाव**—अप्रकाश आणि अप्रवृत्ती तर सत्त्वगुण आणि रजोगुण यांच्या विरोधी आहेत आणि प्रमाद आणि मोह तमोगुणांच्या स्वतःचे आहेत.

***संबंध***—*तात्पुरत्या वाढलेल्या गुणांच्या वृत्तींचे फल काय मिळते ते पुढील दोन श्लोकांत सांगत आहेत.*

**यदा सत्त्वे प्रवृद्धे तु प्रलयं याति देहभृत्।**
**तदोत्तमविदां लोकानमलान्प्रतिपद्यते॥ १४॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यदा** | = ज्यावेळी | **तु** | = जर | **उत्तमविदाम्** | = उत्तमवेत्त्यांच्या |
| **सत्त्वे** | = सत्त्वगुण | **देहभृत्** | = देहधारी मनुष्याचा | **अमलान्** | = निर्मळ |
| **प्रवृद्धे** | = वाढलेला असतो, | **याति** | = मृत्यू झाला (तर तो) | **लोकान्** | = लोकांत |
| **तदा** | = त्यावेळी | | | **प्रतिपद्यते** | = जातो. |

***व्याख्या***— **यदा सत्वे प्रवृद्धे.........प्रतिपद्यते**— ज्यावेळी कोणत्याही देहधारी मनुष्याचे ठिकाणी, मग तो सत्त्वगुणी, रजोगुणी अथवा तमोगुणीही का असेना, कोणत्याही कारणाने सत्त्वगुण तात्पुरता वाढला अर्थात् सत्त्वगुणाचे कार्य स्वच्छता, निर्मळता इत्यादी वृत्ती तात्पुरत्या वाढल्या, त्यावेळी जर त्या मनुष्याचा मृत्यू झाला, तर तो उत्तम (शुभ) कर्म करणाऱ्यांच्या निर्मळ लोकांमध्ये जातो.

**उत्तमविदाम्**—म्हणण्याचे तात्पर्य जी माणसे उत्तम (शुभ) कर्मच करत असतात, अशुभ कर्म कधी करतच नाहीत अर्थात् ज्यांचे भाव उत्तम आहेत, ज्यांचे कर्म उत्तमच आहेत आणि त्यांचे ज्ञानही उत्तमच आहे, अशा पुण्यकर्मी लोकांचा ज्या लोकांवर अधिकार असतो, त्याच निर्मळ लोकात, ज्याचा मृत्यू सत्त्वगुण वाढला असताना होतो, तो मनुष्य जातो. तात्पर्य आयुष्यभर शुभ कर्म करणाऱ्यांना ज्या उच्च लोकांची प्राप्ती होत असते, त्याच लोकात तात्कालिक वाढलेल्या सत्त्वगुणाच्या वृत्तीमध्ये ज्याचा मृत्यू होतो, तो जातो.

सत्त्वगुणाच्या वाढीत मृत्यू झालेली माणसे पुण्यात्म्यांच्या प्राप्तव्य श्रेष्ठ लोकात जातात. यावरुन सिद्ध होते की, गुणापासून उत्पन्न होणाऱ्या वृत्ती कर्मापेक्षा कमकुवत नाहीत. म्हणून सात्त्विक वृत्तीसुद्धा पुण्यकर्मांइतकीच श्रेष्ठ आहे. या दृष्टीने शास्त्रविहित पुण्यकर्मांमध्येही भावनेचेच महत्त्व आहे, विशिष्ट पुण्यकर्माचे नव्हे. म्हणून सात्त्विक भावनेचे स्थान फार श्रेष्ठ आहे. पदार्थ, क्रिया, भाव आणि उद्देश ही चारही क्रमाने एकापेक्षा एक श्रेष्ठ आहेत.

रजोगुण आणि तमोगुणापेक्षा सत्त्वगुणाची वृत्ती सूक्ष्म आणि व्यापक असते. लोकामध्येही स्थूलापेक्षा सूक्ष्माचा आहार कमी असतो. जसे देवतालोक सूक्ष्म असल्याने केवळ सुगंधानेच तृप्त होतात. मात्र, स्थूलापेक्षा सूक्ष्मामध्ये शक्ती अवश्य अधिक असते. हेच कारण आहे की, सूक्ष्म भावनेच्या प्रधानतेने अंतसमयी सत्त्वगुणाची वाढही मनुष्याला श्रेष्ठ लोकात घेऊन जाते.

**अमलान्**—म्हणण्याचे तात्पर्य सत्त्वगुणाचे स्वरूप निर्मळ आहे, म्हणून सत्त्वगुण वाढला असता जो मृत्यू पावतो, त्याला निर्मळ लोकांचीच प्राप्ती होत असते.

येथे एक शंका अशी येते की, आयुष्यभर शुभ कर्म

करणाऱ्यांना ज्या लोकांची प्राप्ती होत असते, त्या लोकांमध्ये सत्त्वगुणाची वृत्ती वाढली असताना मरणारा कसा जाईल? भगवंताची ही एक विशेष सवलत आहे की, अंतकाळी जशी मती असेल तशीच त्याची गती होत असते (८। ६). म्हणून सत्त्वगुणाची वृत्ती वाढली असताना मृत्यू होणारा मनुष्य उत्तम लोकांमध्ये जाईल, यांत संशय घेण्याचे मुळीच कारण नाही.

**परिशिष्ट भाव—'तदोत्तमविदां लोकानमलान्'**—विवेकवान् पुरुष उत्तमवेत्ता आहेत. जर सत्त्वगुणाला आपले मानून त्यात रममाण होणार नाही आणि भगवंताच्या सम्मुख राहील तर तो सात्त्विक मनुष्य सत्त्वगुणापासूनही असंग (गुणातीत) होऊन भगवंताच्या परमधामाकडे निघून जाईल. नाही तर सत्त्वगुणाचा संबंध राहिल्यास तो ब्रह्मलोकापर्यंतच्या उच्च लोकांत निघून जाईल.

**'अमलान्'**—ब्रह्मलोकापर्यंतच्या लोकांत तर सापेक्ष निर्मळता आहे, परंतु भगवंताच्या परमधामात निरपेक्ष निर्मळता आहे.

**रजसि प्रलयं गत्वा कर्मसङ्गिषु जायते।**
**तथा प्रलीनस्तमसि मूढयोनिषु जायते॥ १५॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **रजसि** | = रजोगुण वाढला असता | | मनुष्ययोनीत | | वाढला असता |
| **प्रलयम्, गत्वा** | = मरणारा प्राणी | **जायते** | = जन्म घेतो | **प्रलीनः** | = मरणारा |
| **कर्मसङ्गिषु** | = कर्मसंगी | **तथा** | = तसेच | **मूढयोनिषु** | = मूढ योनीत |
| | | **तमसि** | = तमोगुण | **जायते** | = जन्म घेतो. |

*व्याख्या*—**रजसि प्रलयं गत्वा कर्मसङ्गिषु जायते**—अंतसमयी कोणत्याही मनुष्यात कोणत्याही कारणाने रजोगुणांच्या लोभ, प्रवृत्ती, अशांती, स्पृहा इत्यादी वृत्ती वाढल्या आणि त्याच वृत्तींच्या चिंतनामध्ये त्याचा मृत्यू झाला तर तो मृतात्मा प्राणी कर्माची आसक्ती ठेवणाऱ्या मनुष्याच्या जन्माला येतो.

ज्याने आयुष्यभर शुभकर्म, शुभ आचरण केली आहेत, ज्याचे उत्तम भाव राहिले आहेत, तो जर अंतकाळी रजोगुण वाढला असता मृत्यू पावला तर तो मृत्यूनंतर मनुष्यजन्मात येऊनही त्याचे आचरण, भाव उत्तमच राहतील, तो शुभ कर्म करणाराच होईल. साधारण जीवन व्यतीत केलेला माणूस, तो जर अंतसमयी रजोगुणाच्या लोभ इत्यादी वृत्ती वाढल्या असता मृत्यू पावला तर तो मनुष्ययोनीत जन्म घेऊन पदार्थ, व्यक्ती, क्रिया, इत्यादीविषयी आसक्ती ठेवणाराच होईल. ज्याच्या जीवनामध्ये काम, क्रोधाचीच मुख्यता राहिलेली असते, तो जर रजोगुण वाढला असता मृत्यू पावला तर तो मनुष्ययोनीत जन्माला येऊनही विशेषरूपाने आसुरी संपत्ती असणाराच होईल. तात्पर्य मनुष्यलोकात जन्माला येऊनही गुणांच्या कमी-अधिकतेमुळे माणसांचे तीन प्रकार होतात अर्थात् तीन प्रकारच्या स्वभावाची माणसे होतात. परंतु यात एक विशेष लक्षात ठेवण्यासारखी गोष्ट आहे की, रजोगुण वाढला असता मृत्यू होऊन मनुष्यजन्मात येणारा प्राणी, कशाही आचरणाचा का असेना, त्या सर्वात भगवत्प्रदत्त विवेक राहतच असतो. म्हणून सर्व मनुष्य या विवेकाला महत्त्व देऊन सत्संग, स्वाध्याय इत्यादीने या विवेकाला स्वच्छ करून उन्नत होऊ शकतात, परमात्म्याला प्राप्त करू शकतात. या भगवत्प्रदत्त विवेकामुळेच सर्वची सर्व माणसे भगवत्प्राप्तीचे अधिकारी होतात.

**तथा प्रलीनस्तमसि मूढयोनिषु जायते**—अंतकाळी एखाद्या मनुष्यामध्ये काही कारणाने तात्पुरता तमोगुण वाढला, अर्थात् तमोगुणाच्या प्रमाद, मोह, अप्रकाश, इत्यादी वृत्ती वाढल्या आणि त्या वृत्तींचे चिंतन करत असताच तो मृत्यू पावला, तर तो मनुष्य पशू, पक्षी, कीट, पतंग, वृक्ष, लता इत्यादी मूढयोनीत जन्माला येतो. या मूढयोनीत मूढता तर सर्वांत राहते, परंतु ती कमी-अधिक रूपाने राहत असते. जसे वृक्ष, लता, इत्यादी योनीत जितकी अधिक मूढता असते, तितकी मूढता पशू, पक्षी इत्यादी योनीत नसते.

उत्तम (शुभ) काम करणारा मनुष्य जर अंतसमयी तमोगुणाची तात्पुरती वृत्ती वाढली असता मृत्यू होऊन मूढ योनीत जरी जन्माला आला, तर तेथेही त्याचे गुण, आचरण चांगलेच राहतील. त्याचा स्वभाव शुभ कर्म करण्याचाच राहील. जसे भरतमुनी यांचा अंतसमयी तमोगुणाच्या वृत्तीत अर्थात् हरिणाच्या चिंतनात मृत्यू झाला, तेव्हा ते मूढयोनी असणाऱ्या हरिण योनीत जन्माला आले. परंतु त्यांचा मनुष्य जन्मात केलेला त्याग, तप हरिणाच्या जन्मातही तसेच कायम राहिले. ते हरिण योनीतही आपल्या मातेबरोबर राहिले नाहीत, हिरवी पाने न खाता वाळलेली पाने खात होते इत्यादी. अशी सावधानी मनुष्यातही फार कमी असते, जी भरतमुनीच्या हरिण जन्मात होती.

**परिशिष्ट भाव**—रजोगुणात 'राग' (आसक्ती) अंशच बांधणारा, जन्म-मरण देणारा आहे, 'क्रिया' अंश नाही. आसक्ती झाल्यामुळेच '**कर्मसङ्गिषु जायते**' म्हटले आहे. क्रियारूपाने रजोगुण तर गुणातीतामध्येही होतो—'**प्रकाशं च प्रवृत्तिं च**' (गीता १४। २२). पदार्थ, क्रिया अथवा व्यक्ती—यापैकी कशातही आसक्ती होईल तर तो कर्मसंगी मनुष्ययोनीत जन्माला येईल. मनुष्य स्वाभाविक कर्मसंगी आहे. कारण कर्म करण्याचा अधिकार मनुष्ययोनीतच आहे—'**कर्मानुबन्धीनि मनुष्यलोके**' (गीता १५। २).

***संबंध**—अन्तकाळी गुणांची तात्कालीक वाढ झालेली असता मरणाऱ्या मनुष्यांच्या अशा गती का होतात—हे पुढील श्लोकात सांगत आहेत.*

## कर्मणः सुकृतस्याहुः सात्त्विकं निर्मलं फलम्।
## रजसस्तु फलं दुःखमज्ञानं तमसः फलम्॥ १६॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **सुकृतस्य** | = शुभ | **फलम्** | = फल | | आहे आणि) |
| **कर्मणः** | = कर्माचे | **आहुः** | = म्हटले आहे, | **तमसः** | = तामस कर्माचे |
| **तु** | = तर | **रजसः** | = राजस कर्माचे | **फलम्** | = फल |
| **सात्त्विकम्** | = सात्त्विक, | **फलम्** | = फल | **अज्ञानम्** | = अज्ञान (मूढ़ता) |
| **निर्मलम्** | = निर्मळ | **दुःखम्** | = दुःख (म्हटले | | (म्हटले आहे.) |

***व्याख्या***— [वास्तविक कर्म ही सात्त्विक, राजस, अथवा तामसही नसतात. सर्वच कर्म केवळ क्रियाच असतात. वास्तविक त्या कर्मांना करणारा कर्ताच सात्त्विक, राजस आणि तामस असतो. सात्त्विक कर्त्याकडून केली गेलेली कर्म "सात्त्विक", राजस कर्त्याद्वारा केली गेलेली कर्म "राजस" आणि तामस कर्त्याकडून केली गेलेली कर्म "तामस" म्हटली जातात.]

**कर्मणः सुकृतस्याहुः सात्त्विकं निर्मलं फलम्**— सत्त्वगुणाचे स्वरूप स्वच्छ, निर्मळ आणि निर्विकार आहे. म्हणून सत्त्वगुण असणारा कर्ता जे कर्म करील ते कर्म सात्त्विकच होईल, कारण कर्म कर्त्याचे रूपच असते. या सात्त्विक कर्मामध्ये फलरूपाने जी परिस्थिती प्राप्त होईल, तीही तशीच शुद्ध, निर्मळ, सुखदायी असेल.

फलेच्छारहित होऊन कर्म केले तरीही जोपर्यंत सत्वगुणाशी कर्त्याचा संबंध राहतो तोपर्यंत त्याची "सात्त्विक कर्ता" संज्ञा होते आणि तोपर्यंतच त्याच्या कर्माचे फळ तयार होते. परंतु गुणाशी सर्वथा संबंध-विच्छेद होतो, तेव्हा त्याची "सात्त्विक कर्ता" संज्ञा राहत नाही आणि त्याच्याकडून झालेल्या कर्माचे फलही तयार होत नसते, तर त्याच्याकडून झालेली कर्मे अकर्म होत असतात.

**रजसस्तु फलं दुःखम्**—रजोगुणाचे स्वरूप आसक्ती-रूपच असते. म्हणून आसक्ती असलेल्या कर्त्याद्वारा जी कर्म होतील, ती कर्महो राजस होतील आणि त्या राजस कर्माचे फल भोग राहील. तात्पर्य, त्या राजस कर्माने पदार्थांचा भोग होईल, शरीराला सुख, आराम इत्यादींचा भोग मिळेल, संसारात आदर-सत्काराचा भोग मिळेल आणि मृत्यूनंतर स्वर्गादी लोकांच्या भोगांची प्राप्ती होईल. परंतु हे जितके काही संबंधजन्य भोग आहेत, ते सर्वचे सर्व दुःखालाच कारण आहेत—"**ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते**" (५।२२) अर्थात् जन्म-मरण देणारे आहेत. याच दृष्टीने भगवंतांनी येथे राजस कर्माचे फल दुःख सांगितले आहे.

रजोगुणापासून दोन वस्तूं उत्पन्न होतात—पाप आणि दुःख. रजोगुणी मनुष्य वर्तमानकाळात पाप करत असतो आणि परिणामी त्या पापांचे फल दुःख भोगत असतो. तीसऱ्या अध्यायाच्या छत्तीसाव्या श्लेकात अर्जुनाकडून "मनुष्य इच्छित नसतानाही पाप का करत असतो?" असे विचारले गेल्यावर त्याच्या उत्तरात भगवंतांनी रजोगुणापासून उत्पन्न होणाऱ्या कामनेलाच पाप करविण्यात कारण सांगितले आहे.

**अज्ञानं तमसः फलम्**—तमोगुणाचे स्वरूप मोहनात्मक आहे. म्हणून मोह असणारा तामस कर्ता परिणाम, हिंसा, हानी आणि सामर्थ्याला न पाहता मूढतापूर्वक जे काही कर्म करेल, ते कर्म तामसच होईल आणि त्या तामस कर्माचे फल अज्ञान अर्थात् अज्ञानबाहुल्य योनींचीच प्राप्ती होईल. त्या कर्मानुसार त्याचा पशू, पक्षी, कीट, पतंग, वृक्ष, लता, पर्वत इत्यादी मूढ योनीत जन्म होईल, ज्यामध्ये अज्ञानाची (मूढता) मुख्यता राहत असते.

या श्लोकाचा निष्कर्ष असा निघाला की, सात्त्विक पुरुषासमोर कशीही परिस्थिती आली, तरी त्यावेळी त्याला दुःख होऊ शकत नाही. राजस पुरुषासमोर कशीही परिस्थिती येवो, परंतु त्यात त्याला सुख मिळू शकत नाही. तामस

मनुष्यासमोर कशीही परिस्थिती येवो, परंतु त्यावेळी त्याचा विवेक जागृत होऊ शकत नाही, तर त्यावेळी त्याची मूढताच राहील.

गुण (भाव) आणि परिस्थिती तर कर्मानुसारच येत असते. जोपर्यंत गुण (भाव) आणि कर्माशी संबंध राहत असतो, तोपर्यंत मनुष्य कोणत्याही परिस्थितीत सुखी होऊ शकत नाही. जेव्हा गुण आणि कर्माशी संबंध राहत नाही, तेव्हा मनुष्य कोणत्याही परिस्थितीत कधी दुःखी होऊ शकत नाही आणि बंधनात पडू शकत नाही.

जन्म होण्यात अंतकालीन चिंतनच मुख्य असते आणि अंतकालीन चिंतनाच्या मूळात गुणांची वाढ होणे हे असते आणि गुणांची वाढ कर्मांनुसार होत असते. तात्पर्य मनुष्याचा जसा भाव (गुण) असेल, तसे तो कर्म करील आणि जसे कर्म करील तसा भाव दृढ होईल तसेच त्या भावानुसार अंतिम चिंतन होईल. म्हणून पुढील जन्म होण्यात अंतकालीन चिंतनच मुख्य राहिले. चिंतनाच्या मूळात भाव आणि भावाच्या मूळात कर्म राहते. या दृष्टीने गती होण्यात अंतिम चिंतन, भाव(गुण) आणि कर्म हे तिन्ही कारण आहेत.

**परिशिष्ट भाव**—रजोगुणाचे स्वरूप आसक्ती आहे आणि त्या आसक्तीमुळेच दुःख होते—**'रजसस्तु फलं दुःखम्'**. संसारातील सर्वच दुःख आणि पाप आसक्तीमुळेच होतात. आसक्तीमुळेच काम उत्पन्न होतो—**'काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः'** (गीता ३। ३७).

**'अज्ञानं तमसः फलम्'**—तमोगुण ज्ञान, प्रकाश, विवेक होऊ देत नाही. कारण तमोगुण अज्ञान उत्पन्न करणारा आणि अज्ञानापासूनच उत्पन्न होणारा आहे (याच अध्यायाचा आठवा आणि सतरावा श्लोक).

***संबंध***—*पूर्व श्लोकात भगवंतांनी गुणांच्या तात्कालीन वृत्ती वाढल्यास ज्या गती होतात त्यांच्या मूळात सात्त्विक, राजस आणि तामस कर्म सांगितले. आता सात्त्विक, राजस आणि तामस कर्मांच्या मूळात गुण आहेत असे दाखविण्यासाठी भगवान् पुढील श्लोक सांगत आहेत.*

## सत्त्वात्सञ्जायते ज्ञानं रजसो लोभ एव च।
## प्रमादमोहौ तमसो भवतोऽज्ञानमेव च॥१७॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **सत्त्वात्** | = सत्त्वगुणापासून | **लोभः** | = लोभ (इत्यादी) | **प्रमादमोहौ** | = प्रमाद, मोह |
| **ज्ञानम्** | = ज्ञान | **एव** | = निःसंशय | **च** | = आणि |
| **च** | = आणि | **सञ्जायते** | = उत्पन्न होतात. | **अज्ञानम् एव** | = अज्ञानही |
| **रजसः** | = रजोगुणापासून | **तमसः** | = तमोगुणापासून | **भवतः** | = उत्पन्न होते. |

***व्याख्या***—**सत्त्वात्सञ्जायते ज्ञानम्**—सत्त्वगुणापासून ज्ञान होते अर्थात् सुकृत-दुष्कृत कर्मांचा विवेक होतो. त्या विवेकाने मनुष्य सुकृत, सत्कर्मच करतो. त्या सुकृत कर्मांचे फल सात्त्विक, निर्मळ असते.

**रजसो लोभ एव च**—रजोगुणापासून लोभ इत्यादी उत्पन्न होतात. लोभाविष्ट होऊन मनुष्य जे कर्म करत असतो, त्या कर्माचे फल दुःख असते.

जितके मिळाले आहे, त्यात वाढ व्हावी अशी इच्छा करणे याला लोभ म्हणतात. लोभाची दोन रूपे आहेत—उचित खर्च न करणे आणि अनुचित रीतीने संग्रह करणे. उचित कार्यात धन खर्च न करण्याने, त्यात खर्च करण्याचे टाळल्याने, मनुष्याच्या मनात अशांती आणि चलबिचल राहत असते आणि अनुचित रीतीने अर्थात् असत्य, कपट इत्यादी मार्गाने धनाचा संग्रह केल्याने पाप होत असते, ज्यामुळे नरकात अथवा चौऱ्यांशी लाख योनींत दुःख भोगावे लागते. या दृष्टीने राजस कर्माचे फल दुःख आहे.

**प्रमादमोहौ तमसो भवतोऽज्ञानमेव च**—तमोगुणाने प्रमाद, मोह आणि अज्ञान उत्पन्न होत असते. या तिन्हींच्या बुद्धीमध्ये येण्याने विवेकविरुद्ध काम होतात (१८।३२), ज्यामुळे अज्ञानच दृढ होत जाते.

येथे तर तमोगुणाने अज्ञानाचे उत्पन्न होणे सांगितले आहे आणि याच अध्यायाच्या आठव्या श्लोकात अज्ञानाने तमोगुण उत्पन्न होत असल्याचे म्हटले आहे. याचे तात्पर्य, जसे वृक्षापासून बीज उत्पन्न होत असते आणि त्या बीजापासून पुढे अनेक वृक्ष उत्पन्न होतात, याप्रमाणेच तमोगुणापासून अज्ञान उत्पन्न होते आणि अज्ञानापासून तमोगुण वाढतो, पुष्ट होतो.

पूर्वी आठव्या श्लोकात भगवंतांनी प्रमाद, आळस आणि निद्रा—हे तीन सांगितले परंतु तेराव्या श्लोकात आणि येथे प्रमाद तर सांगितला पण निद्रा सांगितली नाही.

यावरुन हे सिद्ध होते की, आवश्यक निद्रा तमोगुणी नाही आणि निषिद्धही नाही, तसेच बंधनातही टाकणारी नाही. कारण शरीरासाठी आवश्यक निद्रा तर सात्त्विक पुरुषालाही येत असते आणि गुणातीत पुरुषालाही येत असते. वास्तविक अधिक निद्राच बंधनात टाकणारी, निषिद्ध आणि तमोगुणी आहे. कारण अधिक निद्रेने शरीरात आळस वाढतो, पडूनच रहावे असे मनाला वाटते आणि पुष्कळ वेळ व्यर्थ नष्ट होतो.

### विशेष संकेत

हा जीव साक्षात् परमात्म्याचा अंश असूनही जेव्हा प्रकृतीशी संबंध जोडून घेतो, तेव्हा याचा प्रकृतिजन्य गुणांशी संबंध जुटतो. मग गुणांनुसार त्याच्या अंत:करणात वृत्ती उत्पन्न होतात. त्या वृत्तिंनुसार कर्म होत राहतात आणि याच कर्मांचे फल उच्च-नीच गती प्राप्त होतात. तात्पर्य, जीवित अवस्थेत अनुकूल-प्रतिकूल परिस्थिती प्राप्त होतात आणि मृत्यूनंतर उच्च-नीच गती प्राप्त होतात. वास्तविक त्या कर्मांच्या मूळातही गुणांच्या वृत्तीच असतात, ज्या पुनर्जन्म होण्यात मुख्य कारण बनतात. (१३।२१) तात्पर्य गुणाचा संग कर्मांपेक्षा कमकुवत नाही. जसे कर्म शुभ-अशुभ फल देत असतात तसेच गुणांचा संगही शुभ-अशुभ फल देत असतो. (८।६) म्हणूनच पाचव्यापासून अठराव्या श्लोकापर्यंतच्या या प्रकरणात, प्रथम चौदाव्या-पंधराव्या श्लोकांत गुणांच्या तात्कालिक वृत्तीच्या वाढण्याचे फल सांगितले आणि जीवित अवस्थेत ज्या परिस्थिती प्राप्त होतात, त्यांना सोळाव्या श्लोकात सांगितले, तसेच पुढे अठराव्या श्लोकात गुणांच्या स्थायी वृत्तीचे फल सांगतील. म्हणून वृत्ती आणि कर्म होण्यात गुणच मुख्य आहेत. या पूर्ण प्रकरणात गुणांची मुख्य गोष्ट याच (सतराव्या) श्लोकात सांगितली गेली आहे.

ज्याचा उद्देश संसार नाही, तर परमात्मा आहे, तो सामान्य मनुष्याप्रमाणे प्रकृतीत स्थित राहत नसतो. म्हणून त्याच्या ठिकाणी प्रकृतिजन्य गुणांची परवशता राहत नाही आणि साधन करीत करीत कालान्तराने जेव्हा अहंता परिवर्तित होऊन लक्ष्याची दृढता होते, तेव्हा त्याला आपल्या स्वत:सिद्ध गुणातीत स्वरूपाचा अनुभव होतो. याचेच नाव बोध आहे. या बोधाच्या विषयात भगवंतांनी या अध्यायाचा पहिला-दुसरा श्लोक सांगितला आणि गुणातीताच्या विषयात बावीसाव्यापासून सव्वीसाव्या श्लोकापर्यंतचे पाच श्लोक सांगितले. अशा रीतीने हा पूर्ण अध्याय गुणातीत स्वत:सिद्ध स्वरूपाचा अनुभव करण्यासाठीच सांगितला गेला आहे.

**परिशिष्ट भाव**—ज्ञान (विवेक) सत्त्वगुणाने प्रकट होते आणि संग न केल्यास वाढत-वाढत तत्त्वबोधापर्यंत जाते अर्थात् तत्त्वबोधात परिणत होते. परंतु लोभ, प्रमाद, मोह, अज्ञान वाढतात तेव्हा काही नुकसान होणे बाकी राहत नाही, काही दु:ख होणे बाकी राहत नाही, कोणती मूढयोनी प्राप्त होणे बाकी राहत नाही, कोणता नरक प्राप्त होणे बाकी राहत नाही.

***संबंध***—*तात्कालिक गुण-वृद्धीत मरणाऱ्यांच्या गतीचे वर्णन तर चौदाव्या पंधराव्या श्लोकांत झाले परंतु ज्यांच्या जीवनात सत्त्वगुण, रजोगुण आणि तमोगुणाची प्रधानता राहत असते त्यांची (मृत्यूनंतर) कोणती गती होते, याचे वर्णन पुढील श्लोकांत करत आहेत.*

## ऊर्ध्वं गच्छन्ति सत्त्वस्था मध्ये तिष्ठन्ति राजसा:।
## जघन्यगुणवृत्तिस्था अधो गच्छन्ति तामसा:॥१८॥

**सत्त्वस्था:** = सत्त्वगुणात स्थित असेलेली माणसे
**ऊर्ध्वम्** = ऊर्ध्वलोकांत
**गच्छन्ति** = जातात,
**राजसा:** = रजोगुणात स्थित असलेली माणसे
**मध्ये** = मनुष्यलोकात
**तिष्ठन्ति** = जन्म घेतात (आणि)
**जघन्यगुण-वृत्तिस्था:** = निंदनीय तमोगुणाच्या वृत्तीत स्थित असलेली
**तामसा:** = तामस माणसे
**अध:** = अधोगतीला
**गच्छन्ति** = जातात.

*व्याख्या*—**उर्ध्वं गच्छन्ति सत्त्वस्था:**—ज्यांच्या जीवनात सत्त्वगुणाची प्रधानता असते आणि ज्या कारणाने त्यांनी भोगांचा संयम केला आहे, तीर्थ, व्रत, दान इत्यादी शुभ कर्म केली आहेत, दुसऱ्यांच्या सुख-आरामासाठी पाणपोया, अन्नक्षेत्र इत्यादी चालविले आहेत, सडका तयार केल्या आहेत, पशु-पक्ष्यांच्या सुविधेसाठी वृक्ष-लता लावल्या आहेत, गोशाळा बांधल्या आहेत, त्या मनुष्यांना येथे "**सत्त्वस्था:**" म्हटले गेले आहे. सत्त्वगुणाच्या प्रधानतेतच जेव्हा यांचा देहान्त होतो, तेव्हा ते त्यांचा सत्त्वगुणाशी संबंध असल्याने, सत्त्वगुणात आसक्ती असल्याने स्वर्गादी उच्च लोकात जातात. त्या लोकांचे वर्णन याच अध्यायाच्या चौदाव्या श्लोकात "**उत्तमविदां अमलान् लोकान्**" पदांनी केले गेले आहे.

उर्ध्वलोकात जाणाऱ्या माणसांना तेजस्तत्त्वप्रधान शरीराची प्राप्ती होत असते.

**मध्ये तिष्ठन्ति राजसाः—**ज्या माणसांच्या जीवनात रजोगुणाची प्रधानता असते आणि त्यामुळे जे शास्त्र मर्यादेत राहूनच संग्रह करणे आणि भोग भोगणे, ऐश आराम करणे, पदार्थात ममता, आसक्ती ठेवणे इत्यादीमध्ये मग्न असतात, त्यांना येथे ''**राजसाः**'' म्हटले गेले आहे, जेव्हा रजोगुणाच्या प्रधानतेतच अर्थात् रजोगुणाच्या कार्यांच्या चिंतनातच अशा मनुष्यांचा देहान्त होतो, तेव्हा ते पुन्हा या मृत्युलोकातच जन्म घेतात. येथे त्यांना पृथ्वीतत्त्वप्रधान मनुष्यशरीराची प्राप्ती होत असते.

येथे ''**तिष्ठन्ति**'' पद देण्याचे तात्पर्य, ती राजस माणसे आता जसे या मृत्युलोकात असतात, मृत्यूनंतर पुन्हा ती मृत्युलोकात येऊन अशीच बनतात अर्थात् जशी पूर्वी होती तशीच होतात. ती अशुद्ध आचरण करत नाहीत, शास्त्रमर्यादा ओलांडत नाहीत, तर शास्त्रमर्यादेतच राहत असतात आणि शुद्ध आचरण करतात, परंतु पदार्थ, व्यक्ती इत्यादीत राग, आसक्ती, ममता, असल्याकारणाने ते पुन्हा मृत्युलोकातच जन्म घेतात.

**जघन्यगुणवृत्तिस्था अधो गच्छन्ति तामसाः—**ज्या माणसांच्या जीवनात तमोगुणाची प्रधानता राहत असते आणि त्यामुळे ज्यांनी प्रमादादिकांना वश होऊन निरर्थक पैसा आणि समय व्यर्थ घालविला आहे, जे आळस आणि निद्रेतच पडून राहिलेले आहेत, आवश्यक कार्यांनाही ज्यांनी वेळेवर केले नाही, ज्यांनी दुसऱ्यांचे अहितच चिंतिले आहे, ज्यांनी दुसऱ्यांचे अहितच केले आहे, दुसऱ्यांना दुःख दिले आहे, ज्यांनी असत्य, कपट, चोरी, डाके घालणे इत्यादी निंदनीय कर्म केली आहेत, अशा माणसांना येथे ''**जघन्यगुणवृत्तिस्थाः**'' म्हटले गेले आहे. जेव्हा तमोगुणाच्या प्रधानतेतच अर्थात् तमोगुणाच्या कार्याच्या चिंतनातच अशा माणसांचा देहान्त होतो, तेव्हा ते अधोगतीला जातात.

अधोगतीचे दोन भेद आहेत. योनिविशेष-स्थानविशेष. पशू, पक्षी, कीट, पतंग, साप, विंचू, भूत-प्रेत इत्यादी ''योनिविशेष'' अधोगती आहे आणि वैतरिणी, असिपत्र, लालाभक्ष, कुम्भीपाक, रौरव, महारौरव, इत्यादी नरकांचे कुंड ''स्थानविशेष'' अधोगती आहे. ज्यांच्या जीवनात सत्त्वगुण अथवा रजोगुण राहत असतानादेखील अंतकाळी तात्कालिक तमोगुण वाढतो, ती माणसे मृत्यूनंतर योनि-विशेष अधोगतीत अर्थात् मूढयोनीत जातात (१४।१५). ज्यांच्या जीवनात तमोगुणाची प्रधानता असते आणि त्याच तमोगुणाच्या प्रधानतेत ज्यांचा देहान्त होतो, ती माणसे मृत्यूनंतर ''स्थानविशेष'' अधोगतीत अर्थात् नरकात जातात (१६।१६). तात्पर्य सात्त्विक, राजस अथवा तामस माणसाचे अंतिम चिंतन वेगळे झाल्याने त्यांची गती तर अंतिम चिंतनानुसारच होईल. परंतु सुखदुःखाचा भोग त्यांच्या कर्मानुसार होईल. जसे कर्म तर उत्तम आहेत, परंतु अंतिम चिंतन कुत्र्याचे झाले, तर अंतिम चिंतनानुसार तो कुत्रा होईल, परंतु त्या योनीतही त्या कर्मानुसार पुष्कळ सुख आराम मिळेल. कर्म तर वाईट आहेत, परंतु अंतिम चिंतन मनुष्यादिकांचे झाले, तर तो अंतिम चिंतनानुसार मनुष्य होईल, परंतु त्याला कर्मांचे फळ म्हणून भयंकर परिस्थिती प्राप्त होईल. त्याच्या शरीरात रोगच रोग राहतील, खाण्यासाठी अन्न, पिण्यासाठी पाणी आणि नेसण्यासाठी कपडाही फार मुष्किलीने मिळेल.

सात्त्विक गुण वाढविण्यासाठी साधकाने सत-शास्त्रांचे वाचन करावे, खाणे-पिणेही सात्त्विक ठेवावे, राजस-तामस खाणे-पिणे करू नये. सात्त्विक, श्रेष्ठ मनुष्यांचाच संग करावा, त्यांच्याच सान्निध्यात रहावे, त्यांच्या सांगण्यानुसार साधन करावे. शुद्ध पवित्र तीर्थ इत्यादी स्थानांचे सेवन करावे, जेथे कोलाहल असतो अशा राजस स्थानांचा आणि जेथे अण्डे, मांस, मदिरा विक्री होत असते, अशा तामस स्थानाचे सेवन करू नये. प्रातःकाळ आणि सायंकाळची वेळ सात्त्विक मानली जाते, म्हणून या सात्त्विक वेळेचा सदुपयोग करावा, अर्थात् हा काळ, भजन, ध्यान इत्यादीत घालवावा. शास्त्रविहित शुभकर्मच करावेत, निषिद्ध कर्म केव्हाही करू नयेत, राजस, तामस कर्म कधीही करू नयेत. जो ज्या वर्णाश्रमात स्थित आहे, त्यातच राहून आपपल्या कर्तव्याचे योग्य रीतीने पालन करावे. ध्यान भगवंताचेच करावे. मंत्र- ही सात्त्विक असलेलाच जपावा. अशा प्रकारे सर्व काही सात्त्विक केल्याने जुने संस्कार समाप्त होतात आणि सात्त्विक संस्कार (सत्त्वगुण) वाढतात. श्रीमद्भागवतामध्ये गुणांना वाढविणारे दहा हेतू सांगितले आहेत.

**आगमोऽपः प्रजा देशः कालः कर्म च जन्म च।**
**ध्यानं मन्त्रोऽथ संस्कारो दशैते गुणहेतवः॥**

(११।१३।४)

''शास्त्र, जल (खाणे-पिणे), प्रजा (संग), स्थान, वेळ, कर्म, जन्म, ध्यान, मंत्र आणि संस्कार—ह्या दहा गोष्टी जर सात्त्विक असतील तर सत्त्वगुणाची, राजस असतील तर रजोगुणाची आणि तामसी असतील तर तमोगुणाची वृद्धी करत असतात.''

**विशेष विचार**

अंतसमयी रजोगुणाची तात्कालिक वाढ झाल्याने मरणारा मनुष्य मनुष्यलोकात जन्म घेतो (१४।१५) आणि रजोगुणाची प्रधानता असणारा मनुष्य मृत्यूनंतर पुन्हा या मनुष्यलोकातच येतो (१४।१८) या दोन्ही गोष्टींनी हेच सिद्ध होते की, या मनुष्यलोकातील सर्वच माणसे रजोगुणीच असतात, सत्त्वगुण आणि तमोगुण यांचे ठिकाणी नसतो. जर वास्तविक अशीच गोष्ट असती, तर मग सत्त्वगुणाच्या तात्कालिक वृत्तीच्या वाढीत मरणारा (१४।१४) आणि सत्त्वगुणांमध्ये स्थित राहणारा मनुष्य उच्च लोकात जातो, (१४।१८) तसेच तमोगुणाच्या तात्कालिक वृत्तीच्या वाढीत मरणारा (१४।१५) आणि तमोगुणात स्थित राहणारा मनुष्य अधोगतीला जातो, (१४।१८). सत्त्व, रज आणि तम हे तिन्ही गुण अविनाशी देहीला देहात बांधतात (१४।५) हा सर्व संसार तिन्ही गुणांनी मोहित आहे. (७।१३), सात्त्विक, राजस आणि तामस, हे तीन प्रकारचे कर्ता म्हटले जातात (१८।२६-२८), हे संपूर्ण त्रैलोक्य त्रिगुणात्मक आहे (१८।४०) इत्यादी गोष्टी भगवंतांनी कशा सांगितल्या आहेत?

या शंकेचे समाधान असे आहे की, उर्ध्वगतीत सत्त्वगुणाची तर प्रधानता आहे, परंतु त्याबरोबर रजोगुण-तमोगुणही राहत असतात. म्हणून देवतांचे देखील सात्त्विक, राजस आणि तामस स्वभाव असतात. म्हणून सत्त्वगुणाची प्रधानता असली तरी त्यात अवांतर भेद राहतात. तसेच मध्यगतीत रजोगुणाची प्रधानता असली तरी त्याबरोबर सत्त्वगुण, तमोगुण राहत असतात. म्हणून माणसांचेही सात्त्विक, राजस आणि तामस स्वभाव असतात. अधोगतीत तमोगुणाची प्रधानता असते, परंतु त्याबरोबर सत्त्वगुण, रजोगुणही राहत असतात. म्हणून पशू, पक्षी इत्यादीमध्ये तसेच भूत-प्रेत गुह्यक इत्यादीमध्ये आणि नरकांच्या प्राण्यांतही भिन्न भिन्न स्वभाव असतो. कित्येक सौम्य स्वभावाचे असतात, कित्येक मध्यम स्वभावाचे असतात आणि कित्येक क्रूर स्वभावाचे असतात. तात्पर्य जेथे कोणत्याही गुणाशी संबंध असतो, तेथे तिन्ही गुण राहतीलच. म्हणून भगवंतांनी (१८।४० मध्ये) म्हटले आहे की त्रैलोक्यात असा कोणीही प्राणी नाही, जो तिन्ही गुणांनी रहित आहे.

उर्ध्वगतीत सत्त्वगुणाची प्रधानता, रजोगुणाची गौणता आणि तमोगुणाची अत्यंत गौणता राहत असते. मध्यगतीत रजोगुणाची प्रधानता, सत्त्वगुणाची गौणता आणि तमोगुणाची अत्यंत गौणता राहत असते. अधोगतीत तमोगुणाची प्रधानता, रजोगुणाची गौणता आणि सत्त्वगुणाची अत्यंत गौणता, राहत असते. तात्पर्य सत्त्व, रज आणि तम—तिन्ही गुणांची प्रधानता असणाऱ्यातही अधिक, मध्यम आणि कनिष्ठ मात्रेत प्रत्येक गुण राहत असतो. अशा रीतीने गुणांचे शेकडो-हजारो सूक्ष्मभेद होतात. म्हणून गुणांच्या तारतम्याने प्रत्येक प्राण्याचा वेगवेगळा स्वभाव असतो.

ज्याप्रमाणे भगवंताकडून सात्त्विक, राजस आणि तामस कार्य होत असूनही ते गुणातीत राहतात. (७।१३) त्याचप्रमाणे गुणातीत महापुरुषाच्या आपल्या म्हणविल्या जाणाऱ्या अंतःकरणात सात्त्विक, राजस आणि तामस वृत्ती निर्माण झाल्या असतानासुद्धा तो गुणातीतच राहत असतो (१४।२२). म्हणून भगवंताची उपासना करणे आणि गुणातीत महापुरुषांचा संग करणे—ह्या दोन्हीही गोष्टी निर्गुण असल्याने साधकाला गुणातीत करणाऱ्या आहेत.

**परिशिष्ट भाव**—तमोगुण थोडा वाढल्यास मनुष्य मूढ योनीत जातो आणि अधिक वाढल्यास नरकाला प्राप्त होतो.

***संबंध***—*पाचव्यापासून अठराव्या श्लोकापर्यंत प्रकृतीचे कार्य गुणांचा परिचय देऊन आता पुढील दोन श्लोकांत स्वच्या तिन्ही गुणांच्या पलीकडील अनुभवाचे वर्णन करीत आहेत.*

## नान्यं गुणेभ्यः कर्तारं यदा द्रष्टानुपश्यति।
## गुणेभ्यश्च परं वेत्ति मद्भावं सोऽधिगच्छति॥ १९॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यदा** | = जेव्हा | **कर्तारम्** | = कर्ता | **परम्** | = पलीकडील |
| **द्रष्टा** | = विवेकी (विचार कुशल) मनुष्य | **अनुपश्यति** | = पाहत (समजत) | **वेत्ति** | = अनुभव करतो, (तेव्हा) |
| | | **न** | = नाही | **सः** | = तो |
| **गुणेभ्यः** | = तिन्ही गुणां (शिवाय) | **च** | = आणि (स्वतःला) | **मद्भावम्** | = माझ्या स्वरूपाला |
| **अन्यम्** | = इतर कोणाला | **गुणेभ्यः** | = गुणांच्या | **अधिगच्छति** | = प्राप्त होतो. |

***व्याख्या***—**नान्यं गुणेभ्यः...मद्भावं सोऽधिगच्छति**—गुणांशिवाय इतर कोणी कर्ता नाहीच अर्थात् संपूर्ण क्रिया गुणांनीच होत आहेत, संपूर्ण परिवर्तन गुणांतच होत आहे. तात्पर्य, संपूर्ण क्रिया आणि परिवर्तनात गुणच कारण आहेत,

आणखी कोणी कारण नाही. ते गुण ज्याच्याकडून प्रकाशित होतात, ते तत्त्व गुणांच्या पलीकडे आहे. गुणांच्या पलीकडे असल्याने ते कधी गुणांनी लिप्त होत नाही अर्थात् गुण आणि क्रिया यांचा त्याच्यावर कोणताही परिणाम होत नाही. अशा त्या तत्त्वाला जो विचारकुशल साधक जाणून घेतो अर्थात् विवेकद्वारा आपल्या स्वत:ला गुणांच्या पलीकडे असम्बद्ध, निर्लिप्त अनुभव करून घेतो की, गुणांशी आपला संबंध कधी झाला नाही आत्ताही नाही, होणार नाही आणि होऊ शकणारही नाही, कारण गुण परिवर्तनशील आहेत आणि ''स्व'' मध्ये कधी परिवर्तन होतच नाही; तो मग माझ्या भावाला, माझ्यास्वरूपाला प्राप्त होतो. तात्पर्य, तो जो अज्ञानाने गुणाशी आपला संबंध मानीत होता, ती मान्यता समाप्त होते आणि माझ्याशी त्याचा जो स्वत:सिद्ध स्वाभाविक संबंध आहे, तो जसाच्या तसा राहतो.

**परिशिष्ट भाव—'गुणेभ्यश्च परं वेत्ति'** चे तात्पर्य हे आहे की, ज्याच्याकडून गुण प्रकाशित होतात, त्या प्रकाशकात आपल्या स्थितीचा अनुभव करणे (गीता—तेराव्या अध्यायाचा एकतीसावा श्लोक).

**'मद्भावं सोऽधिगच्छति'**—पदांचा अर्थ आहे की, तो माझ्या भावाला अर्थात् ब्रह्माला प्राप्त होतो. हीच गोष्ट दुसऱ्या श्लोकात **'मम साधर्म्य मागताः'** पदांने सांगितली गेली आहे.

विवेकी साधक गुणांशिवाय इतर कोणाला कर्ता समजत नाही आणि स्वत:ला गुणांपासून अर्थात् क्रिया आणि पदार्थापासून असंग अनुभव करतो. क्रिया आणि पदार्थाशी असंग अनुभव केल्यावर तो योगारूढ होतो—**'यदा हि नेन्द्रियार्थेषु...........'** (गीता ६। ४). योगारूढ झाल्यास शांतीची प्राप्ती होते आणि त्या शांतीत न अडकल्यास परमात्म्याची प्राप्ती होते.

**गुणानेतानतीत्य त्रीन्देही देहसमुद्भवान्।**
**जन्ममृत्युजरादु:खैर्विमुक्तोऽमृतमश्नुते ॥२०॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **देही** | = देहधारी (विवेकी मनुष्य) | **त्रीन्** | = तिन्ही | | दु:खापासून |
| **देहसमुद्भवान्** | = देहाला उत्पन्न करणाऱ्या | **गुणान्** | = गुणांचे | **विमुक्त** | = रहित असलेल्या |
| **एतान्** | = ह्या | **अतीत्य** | = अतिक्रमण करून | **अमृतम्** | = अमरतेचा |
| | | **जन्ममृत्यु-जरादु:खै:** | = जन्म, मृत्यू आणि वृद्धावस्थारूपी | **अश्नुते** | = अनुभव करतो. |

*व्याख्या*—**गुणानेतानतीत्य त्रीन्देही देहसमुद्भवान्**—जरी विचारकुशल मनुष्याचा देहाशी संबंध नसतो, तरी लोकांच्या दृष्टीत देहधारी असल्याने त्याला येथे ''देही'' म्हटले गेले आहे.

देहाला उत्पन्न करणारे गुणच आहेत. ज्या गुणाशी मनुष्य आपला संबंध मानतो, त्यानुसार त्याला उच्च-नीच योनीत जन्म घ्यावाच लागतो. (१३। २१)

आत्ताच या अध्यायाच्या पाचव्या श्लोकापासून अठराव्या श्लोकापर्यंत ज्यांचे वर्णन झाले आहे, त्याच तिन्ही गुणांसाठी येथे **''एतान् त्रीन् गुणान्''** पद आलेले आहे. विचारकुशल मनुष्य ह्या तिन्ही गुणांचे अतिक्रमण करतो अर्थात् यांच्याशी आपला संबंध मानीत नाही, यांच्याशी मानलेल्या संबंधाचा त्याग करतो. कारण त्याला असा स्पष्ट विवेक झालेला असतो की, सर्वच गुण परिवर्तनशील आहेत, उत्पन्न आणि नष्ट होणारे आहेत आणि आपले स्वरूप गुणाशी कधी लिप्त झाले नाही आणि होऊही शकत नाही. लक्षात ठेवण्याची गोष्ट आहे की, ज्या प्रकृतीपासून हे गुण उत्पन्न होतात, त्या प्रकृतीशीही स्व चा किंचित्मात्रही संबंध नाही, तर मग गुणांशी त्याचा संबंध होऊच कशा शकतो?

**जन्ममृत्युजरादु:खैर्विमुक्तोऽमृतमश्नुते**—जेव्हा साधक या तिन्ही गुणांचे अतिक्रमण करतो, तेव्हा त्याला मग जन्म, मृत्यू आणि वृद्धावस्थेचे दु:ख होत नाही. त्याची जन्म-मृत्यू इत्यादी दु:खापासून सुटका होते, कारण जन्म इत्यादीच्या होण्यात संगच कारण आहे. हे गुण येत-जात राहतात, यांच्यात परिवर्तन होत राहते. गुणांच्या वृत्ती कधी सात्त्विकी, कधी राजसी आणि कधी तामसी होतात. परंतु स्व मध्ये कधी सात्त्विकता, राजसता आणि तामसता येतच नाही. स्व (स्वरूप) तर सहजच असंग राहत असते. या असंग स्वरूपाचा कधी जन्म होत नाही. जर जन्म होत नाही, तर मृत्यूही होत नाही. कारण ज्याचा जन्म होत असतो, त्याचाच मृत्यू होत असतो, तसेच त्याचीच वृद्धावस्था होत असते. गुणांचा संग राहण्यानेच जन्म, मृत्यू आणि वृद्धावस्थेच्या दु:खांचा अनुभव येतो. जो गुणांशी संपूर्णपणे निर्लिप्ततेचा अनुभव करून घेतो, त्याला स्वत:सिद्ध असलेल्या अमरतेचा अनुभव येतो.

देहाशी तादात्म्य (एकता) मानण्यानेच मनुष्य आपल्याला मरणारा समजतो. देहाच्या संबंधाने होणाऱ्या संपूर्ण दु:खामध्ये सर्वात मोठे दु:ख मृत्यूचे मानले गेले आहे. मनुष्य स्वरूपाने अमर तर आहेच. परंतु भोग आणि संग्रहामध्ये आसक्त असल्याने आणि प्रत्येक क्षणाला नष्ट होणाऱ्या शरीराला अमर ठेवण्याच्या इच्छेनेच याला अमरतेचा अनुभव येत नाही. विवेकी मनुष्य देहाशी असलेले तादात्म्य नष्ट झाल्यावर अमरतेचा अनुभव करतो.

पूर्व श्लोकात "**मद्भावं सोऽधिगच्छति**" पदांनी भगवद्भावाची प्राप्ती सांगितली गेली तसेच येथे "**अमृतमश्नुते**" पदांनी अमरतेचा अनुभव करण्यास सांगितले गेले आहे. वास्तविक दोन्ही गोष्टी एकच आहेत.

गीतेत "**जरामरणमोक्षाय**" (७।२९), "**जन्ममृत्युजराव्याधिदु:खदोषानुदर्शनम्**" (१३।८) आणि येथे "**जन्ममृत्युजरादु:खैर्विमुक्त:**"(१४।२०) या तिन्ही ठिकाणी बाल्य आणि तारुण्य अवस्थेचे नाव न घेता "जरा" (वृद्धावस्था) चेच नाव घेतले आहे, परंतु शरीरात बाल्य, तारुण्य आणि वृद्ध या तिन्हीही अवस्था येत असतात. याचे कारण बाल्य आणि तारुण्यावस्थेत मनुष्य अधिक दु:खाचा अनुभव करीत नाही, कारण या दोन्हीही अवस्थेत शरीरात शक्ती असते, परंतु वृद्धावस्थेत शरीरात शक्ती न राहिल्याने मनुष्य अधिक दु:खाचा अनुभव करतो. तसेच जेव्हा मनुष्याचा मृत्यू होतो तेव्हा तो भयंकर दु:खाचा अनुभव करतो. परंतु जो तिन्ही गुणांचे अतिक्रमण करतो, तो नेहमीसाठी जन्म, मृत्यू आणि वृद्धावस्थेच्या दु:खातून मुक्त होतो.

या मनुष्यशरीरात असताना ज्याला बोध होतो, त्याचा मग जन्म होण्याचा प्रश्नच उद्भवत नाही. मात्र, त्याचे आपले म्हणविले जाणारे शरीर राहत असताना वृद्धावस्था आणि मृत्यू तर येईलच, परंतु त्याला वृद्धावस्था आणि मृत्यूचे दु:ख होणार नाही.

वर्तमानकाळी शरीराशी स्व ची एकता मानल्यानेच पुनर्जन्म होत असतो आणि शरीरामध्ये होणाऱ्या वृद्धावस्था, व्याधी इत्यादी दु:खांना जीव आपल्यात मानतो. शरीर गुणांच्या संगाने उत्पन्न होते. देहाला उत्पादक असलेल्या गुणांनी रहित असल्यामुळे गुणातीत महापुरुष देहाच्या संबंधाने होणाऱ्या सर्व दु:खातून मुक्त होतो.

म्हणून प्रत्येक मनुष्याने मृत्यूच्या पूर्वीच आपल्या स्वत:च्या गुणातीत स्वरूपाचा अनुभव करून घेतला पाहिजे. गुणातीत झाल्याने जरा, व्याधी, मृत्यू इत्यादी सर्व प्रकारच्या दु:खातून मुक्ती होते आणि मनुष्य अमरतेचा अनुभव करतो. मग त्याचा पुनर्जन्म होतच नाही.

**परिशिष्ट भाव**—प्रत्येक मनुष्याच्या अंत:करणात असा भाव राहतो की, मी जिवंत रहावे, कधी मरू नये. तो अमर राहू इच्छितो. अमरतेच्या या इच्छेने हे सिद्ध होते की, वास्तविक तो अमर आहे. जर तो अमर नसता तर त्यात अमरतेची इच्छाही राहिली नसती. उदाहरणार्थ, तहान आणि भूक लागते. यावरुन सिद्ध होते की, अशी वस्तू (अन्न आणि पाणी) आहे, ज्यापासून तहान-भूक शांत होते. जर अन्न-पाणी नसते तर तहान-भूकही लागली नसती. म्हणून अमरता स्वत:सिद्ध आहे—'**भूतग्राम: स एवायं........**' (गीता ८।१९). परंतु स्वरूपाने अमर असूनही जेव्हा मनुष्य आपल्या विवेकाचा तिरस्कार करून मरणधर्मा शरीराशी तादात्म्य मानतो अर्थात् 'मी शरीर आहे' असे मानतो तेव्हा त्याच्यात मृत्यूचे भय आणि अमरतेची इच्छा उत्पन्न होते. जेव्हा तो आपल्या विवेकाला महत्त्व देतो की, 'मी शरीर नाही, शरीर तर नित्य मृत्यूकडे धावत आहे आणि मी स्वत: निरंतर अमरतेत राहतो' तेव्हा त्याला आपल्या स्वत:सिद्ध अमरतेचा अनुभव होतो. शरीराच्या विकारांचा, परिवर्तनाचा अनुभव स्वयं सदा एक राहूनच करतो. म्हणून साधकाने त्या विकारांना, परिवर्तनाला प्राधान्य न देता आपल्या असण्याला, आपल्या अमरतेला प्राधान्य द्यावे.

हा श्लोक चौदाव्या अध्यायाचा सार, तात्पर्य आहे.

***संबंध**—गुणातीत पुरुष दु:खातून मुक्त होऊन अमरतेला प्राप्त करतो—असे ऐकून अर्जुनाच्या मनामध्ये गुणातीत मनुष्याची लक्षणे जाणून घेण्याची जिज्ञासा झाली. म्हणून ते पुढील श्लोकात भगवंताला प्रश्न करतात.*

*अर्जुन उवाच*

**कैर्लिङ्गैस्त्रीन्गुणानेतानतीतो भवति प्रभो।**
**किमाचार: कथं चैतांस्त्रीन्गुणानतिवर्तते॥ २१॥**

अर्जुन म्हणाले—

**प्रभो** = हे प्रभो!
**एतान्** = या
**त्रीन्** = तीन
**गुणान्** = गुणांच्या
**अतीत:** = पलीकडे गेलेला मनुष्य

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **कैः** | = कोणत्या | | कसे असते? | **गुणान्** | = गुणांचे |
| **लिङ्गैः** | = लक्षणांनी (युक्त) | **च** | = आणि | **कथम्,** | = अतिक्रमण |
| **भवति** | = असतो? | **एतान्** | = त्या | **अतिवर्तते** | कसे केले |
| **किमाचारः** | = त्याचे आचरण | **त्रीन्** | = तीन | | जाऊ शकते? |

*व्याख्या*— **कैर्लिङ्गैस्त्रीनुगुणानेतानतीतो भवति प्रभो**— हे प्रभो! मी हे जाणून घेऊ इच्छितो की, ज्यांनी गुणांचे अतिक्रमण केले आहे, अशा मनुष्यांची कोणती लक्षणे असतात? तात्पर्य, संसारी माणसांपेक्षा गुणातीत मनुष्यामध्ये अशी कोणती विलक्षणता येत असते, ज्यावरुन सामान्य माणसाने हा गुणातीत पुरुष आहे असे समजून घ्यावे?

**किमाचारः**—त्या गुणातीत मनुष्याचे आचरण कसे असते? अर्थात् साधारण मनुष्याची जशी दिनचर्या आणि रात्रीचर्या असते, गुणातीत मनुष्याची तशीच दिनचर्या-रात्रीचर्या असते अथवा त्यापेक्षा विलक्षण असते? सामान्य माणसाचे जसे आचरण असते, जसे खाणे-पिणे, राहणे, झोपणे-उठणे असते, गुणातीत मनुष्याचे आचरण, खाणे-पिणे इत्यादीही तसेच होते अथवा काही विलक्षण असते?

**कथं चैतांस्त्रीन्गुणानतिवर्तते**—या तीन्ही गुणांचे अतिक्रमण करण्याचा कोणता उपाय आहे? अर्थात् कोणते साधन केल्याने मनुष्य गुणातीत होऊ शकतो?

***संबंध***—*अर्जुनाच्या प्रश्नांपैकी पहिल्या प्रश्नाच्या उत्तरात भगवंत पुढील दोन श्लोकांत गुणातीत मनुष्याची लक्षणे वर्णन करीत आहेत.*

*श्रीभगवानुवाच*

**प्रकाशं च प्रवृत्तिं च मोहमेव च पाण्डव।**
**न द्वेष्टि सम्प्रवृत्तानि न निवृत्तानि काङ्क्षति॥ २२॥**

श्रीभगवान् म्हणाले—

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **पाण्डव** | = हे पाण्डव! | **मोहम्** | = मोह— | **न, द्वेष्टि** | = त्यांचा द्वेष करीत नाही |
| **प्रकाशम्** | = प्रकाश | **सम्प्रवृत्तानि** | = (हे सर्वच) उत्तम | **च** | = आणि |
| **च** | = आणि | | प्रकारे प्रवृत्त झाले | **निवृत्तानि** | = (हे सर्वच) निवृत्त |
| **प्रवृत्तिम्** | = प्रवृत्ती | **एव** | = तरीही | | झाले तरी (यांची) |
| **च** | = तसेच | | (गुणातीत मनुष्य) | **न, काङ्क्षति** | = इच्छा करीत नाही. |

*व्याख्या*— **प्रकाशं च**—इंद्रिये आणि अंतःकरणाची स्वच्छता, निर्मळतेचे नाव "प्रकाश" आहे. तात्पर्य ज्यामुळे इंद्रियांकडून शब्दादी पाच विषयांचे स्पष्ट रीतीने ज्ञान होते, मनाने मनन होत असते आणि बुद्धीने निर्णय होत असतो, त्याचे नाव 'प्रकाश' आहे.

भगवंतांनी पूर्वी (१४। ११ मध्ये) सत्त्वगुणांच्या दोन वृत्ती सांगितल्या होत्या—प्रकाश आणि ज्ञान. त्यापैकी येथे केवळ प्रकाश-वृत्ती घेण्याचे तात्पर्य सत्त्वगुणामध्ये प्रकाश-वृत्तीच मुख्य आहे, कारण जोपर्यंत इंद्रिये आणि अंतःकरणामध्ये प्रकाश येत नाही, स्वच्छता निर्मळता येत नाही, तोपर्यंत ज्ञान (विवेक) जागृत होत नाही. प्रकाश आल्यावरच ज्ञान जागृत होते. म्हणून येथे ज्ञान-वृत्तीला प्रकाशाच्या अंतर्गतच घेतले पाहिजे.

**प्रवृत्तिं च**—जोपर्यंत गुणाशी संबंध राहतो, तोपर्यंत रजोगुणाच्या लोभ, प्रवृत्ती, आसक्तिपूर्वक कर्मांचा आरंभ, अशांती आणि स्पृहा ह्या वृत्ती उत्पन्न होत राहतात. परंतु जेव्हा मनुष्य गुणातीत होतो, तेव्हा रजोगुणाशी तादात्म्य ठेवणाऱ्या वृत्ती तर उत्पन्न होऊच शकत नाहीत, परंतु आसक्ती, कामना-रहित प्रवृत्ती (क्रियाशीलता) राहत असते. ही प्रवत्ती दोषी नसते. गुणातीत मनुष्याकडूनही क्रिया होत असतात. म्हणून भगवंतांनी येथे केवळ "प्रवृत्ती" लाच घेतले आहे.

रजोगुणाची दोन रूपे आहेत—आसक्ती आणि क्रिया. यापैकी आसक्ती तर दुःखाला कारण आहे. ही आसक्ती गुणातीतामध्ये राहत नसते. परंतु जोपर्यंत गुणातीत मनुष्याचे दिसणारे शरीर असते, तोपर्यंत त्याच्याकडून निष्कामभावनेने क्रिया होत असतात. याच क्रियाशीलतेला भगवंतांनी येथे "प्रवृत्ती" नावाने म्हटले आहे.

**मोहमेव च पाण्डव**—मोह दोन प्रकारचा असतो (१) नित्य-अनित्य, सत्-असत्, कर्तव्य-अकर्तव्य, यांचा विवेक न राहणे आणि (२) व्यवहारात चूक होणे. गुणातीत महापुरुषामध्ये पहिल्या प्रकारचा मोह (सत्-असत् इत्यादीचा

विवेक न होणे) तर नसतोच (४।३५) परंतु व्यवहारात चूक होणे अर्थात् एखाद्याच्या सांगण्याने एखाद्या निर्दोष व्यक्तीला दोषी समजणे आणि दोषी व्यक्तीला निर्दोष समजणे इत्यादी तसेच दोरीवर साप दिसणे, मृगजळ दिसणे, शिंपल्यावर चांदी दिसणे इत्यादी भ्रम तर गुणातीत मनुष्यालाही होतो.

**न द्वेष्टि सम्प्रवृत्तानि न निवृत्तानि काङ्क्षति—** सत्त्वगुणाचे कार्य ''प्रकाश'' रजोगुणाचे कार्य ''प्रवृत्ती'' आणि तमोगुणाचे कार्य ''मोह'' हे तिन्हीही चांगल्या रीतीने प्रवृत्त झाल्यावरही गुणातीत महापुरुष यांच्याशी द्वेष करीत नाही आणि हे निवृत्त झाले तरी यांची इच्छा करीत नाही. तात्पर्य अशा वृत्ती का उत्पन्न होत आहेत? यापैकी कोणतीही राहू नये, असा द्वेष करीत नाही आणि ''ह्या वृत्ती आणखी पुन्हा याव्यात, ह्या वृत्ती कायम रहाव्यात'' त्यांच्याविषयी अशी आसक्तीही ठेवीत नाही. गुणातीत असल्यामुळे गुणांच्या वृत्तीं येण्या-जाण्याने त्याच्यात काहीही फरक पडत नाही. तो या वृत्तींशी स्वाभाविकच निर्लिप्त रहातो.

## विशेष गोष्ट

एक तर वृत्तीचे ''होणे'' असते आणि एक वृत्तीचे ''करणे'' (त्यांच्याशी संबंध जोडणे अर्थात् राग-द्वेष करणे) असते. होणे आणि करणे यात फार फरक आहे. ''होणे'' समष्टीगत असते आणि ''करणे'' व्यक्तिगत असते. संसारात जे ''होत'' असते, त्याची जबाबदारी आपल्यावर नसते. जे आपण ''करतो'' त्याचीच जबाबदारी आपल्यावर असते.

ज्या समष्टी शक्तीने संसारमात्राचे संचलन होत असते, त्याच शक्तीने आपले शरीर, इंद्रिये, मन, बुद्धीचेही (जे संसाराचेच अंश आहेत) संचालन होत असते. जर संसारात होणाऱ्या क्रियांचे गुण-दोष आपणाला लागत नाहीत, तर शरीर इत्यादीत होणाऱ्या क्रियांचे गुण-दोष आपल्याला लागूच कसे शकतील? परंतु आपोआप होणाऱ्या क्रियांपैकी काही क्रियांशी मनुष्य राग-द्वेषपूर्वक आपला संबंध जोडतो अर्थात् त्यांचा कर्ता होतो, तेव्हा त्यांचे फल त्यालाच भोगावे लागते. म्हणून अंतःकरणात सत्त्व, रज, आणि तम या तीन गुणांपासून उत्पन्न होणाऱ्या चांगल्या-वाईट वृत्तीशी साधकाने राग-द्वेष करू नये. अर्थात् त्यांच्याशी आपला संबंध जोडू नये.

वृत्तीं कुणाच्याही एकसारख्या राहत नाहीत. तिन्ही गुणांच्या वृत्तीं तर गुणातीत महापुरुषांच्या अंतःकरणातही असतात, परंतु त्यांचा त्या वृत्तींशी राग-द्वेष नसतो. वृत्तीं आपोआप येत असतात आणि जात असतात. गुणातीत महापुरुषाची दृष्टी तिकडे जातच नाही. कारण त्याच्या दृष्टीत एका परमात्मतत्त्वशिवाय काही राहतच नाही.

पाहणे आणि दिसणे—दोन्हीत फार मोठा फरक आहे. पाहणे ''करणे''च्या अंतर्गत येत असते. दोष पाहण्याने होतो, दिसण्याने नव्हे. म्हणून साधकाला जर अंतःकरणात वाईटाती वाईट वृत्तीही दिसली, तरीही त्याने घाबरून जाऊ नये. आपोआप दिसणाऱ्या (होणाऱ्या) वृत्तीशी राग-द्वेष करणे अर्थात् त्यानुसार आपली स्थिती मानणे हेच त्यांना पाहणे आहे. साधकाकडून चूक हीच होते की, तो दिसणाऱ्या वस्तूला पाहू लागतो आणि फसतो. भगवान् राम म्हणतात.

**सुनहु तात माया कृत गुन अरु दोष अनेक।**
**गुन यह उभय न देखिअहिं देखिअ सो अबिबेक॥**
(मानस ७।४१)

साधकाने सखोल विचार केला पाहिजे की, वृत्ती तर उत्पन्न आणि नष्ट होतात परंतु स्व (आपले स्वरूप) नेहमी जसेच्या तसे राहत असतो. वृत्तीत होणाऱ्या परिवर्तनाला पाहणारे स्वरूप परिवर्तनरहित आहे. कारण परिवर्तनशीलाला परिवर्तनशील पाहू शकत नाही, तर परिवर्तनरहितच परिवर्तनशीलाला पाहू शकतो. यावरुन सिद्ध होते की, स्वरूप वृत्तीहून वेगळे आहे. परिवर्तनशील गुणांशी आपला संबंध मानल्यानेच गुणांत होणाऱ्या वृत्तीं आपल्यात प्रतीत होतात. म्हणून साधकाने येणाऱ्या-जाणाऱ्या वृत्तींशी मिसळून आपल्या वास्तविक स्वरूपापासून विचलित होऊ नये. कशाही वृत्तीं उत्पन्न होईनात का, त्यांच्यामुळे खूश-नाखूश होऊ नये, त्यांच्याशी आपली एकात्मता समजू नये. नेहमी एकरस राहणाऱ्या, गुणांशी संपूर्णपणे निर्लिप्त, निर्विकार तसेच अविनाशी असलेल्या आपल्या स्वरूपाला न पाहता परिवर्तनशील, विकारी तसेच विनाशी वृत्तींना पाहणे साधकासाठी फार बाधक आहे.

**परिशिष्ट भाव—**गुणातीत मनुष्यात 'अनुकूलता कायम रहावी आणि प्रतिकूलता निघून जावी' अशी इच्छा नसते. निर्विकारतेचा अनुभव झाल्यास त्याला अनुकूलता-प्रतिकूलतेचे ज्ञान तर होते, परंतु स्वयंवर त्याचा परिणाम होत नाही. अंतःकरणातील वृत्तीं बदलतात, परंतु स्वयं त्यापासून निर्लिप्त राहतो. साधकावरही वृत्तींचा परिणाम होऊ नये. कारण गुणातीत मनुष्य साधकासाठी आदर्श असतो, साधक त्याचा अनुयायी असतो.

संपूर्ण साधकासाठी हे आवश्यक आहे की, त्याने देहाचा धर्म आपल्यात मानू नये. वृत्तीं अंतःकरणात आहेत, आपल्यात

नाहीत. म्हणून साधकाने वृत्तींना चांगलेही मानू नये आणि वाईटही मानू नये आणि आपल्यात मानू नये. कारण वृत्ती तर येणाऱ्या-जाणाऱ्या आहेत, परंतु स्वयं निरंतर राहणारा आहे. जर वृत्ती आपल्यात असत्या तर जोपर्यंत आपण राहतो, तोपर्यंत वृत्तींही राहिल्या असत्या. परंतु हा सर्वांचा अनुभव आहे की, आपण तर निरंतर राहतो, परंतु वृत्ती येत-जात राहतात. वृत्तींचा संबंध प्रकृतीशी आहे आणि आपला (स्वयंचा) संबंध परमात्म्याशी आहे. म्हणून वृत्तींच्या परिवर्तनाचा अनुभव करणारा स्वयं एकच राहतो.

**उदासीनवदासीनो गुणैर्यो न विचाल्यते।**
**गुणा वर्तन्त इत्येव योऽवतिष्ठति नेङ्गते॥ २३॥**

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **यः** | = जो | | जाऊ शकत नाही (तसेच) | **यः** | = जो (आपल्या स्वरूपातच) |
| **उदासीनवत्** | = उदासीनाप्रमाणे | **गुणाः, एव** | = गुणच (गुणांत) | **अवतिष्ठति** | = स्थित राहतो (आणि स्वतः कोणताही) |
| **आसीनः** | = स्थित आहे (आणि) | **वर्तन्ते** | = वर्तत आहेत— | **न, इङ्गते** | = प्रयत्न करीत नाही. |
| **गुणैः** | = (जो) गुणांद्वारा | **इति** | = अशा भावनेने | | |
| **न, विचाल्यते** | = विचलित केला | | | | |

***व्याख्या*— उदासीनवदासीनः**—दोन व्यक्ती परस्परात विवाद करत असतील, तर त्या दोघांपैकी कोण्या एकाचा पक्ष घेणारा ''पक्षपाती'' म्हटला जातो आणि दोघांचा न्याय करणारा ''मध्यस्थ'' म्हणविला जातो. परंतु जो त्या दोघांना पाहत तर असतो, परंतु कोणाचाही पक्ष घेत नाही आणि कोणाला काहीही सांगत नाही, तो ''उदासीन'' म्हटला जातो. तसेच संसार आणि परमात्मा दोन्हींना पाहून गुणातीत मनुष्य उदासीनाप्रमाणे दिसतो.

वास्तविक पाहिले तर संसाराची स्वतंत्र सत्ता नाहीच. सत्स्वरूप परमात्म्याच्या सत्तेनेच संसार सत्ता असणारा दिसत असतो. म्हणून जर गुणातीत मनुष्याच्या दृष्टीत संसाराची सत्ता नाहीच, केवळ एका परमात्म्याचीच सत्ता आहे, तर मग तो उदासीन कोणाशी असतो? वास्तविक तो उदासीन नसतो परंतु ज्यांच्या दृष्टीत संसार आणि परमात्मा ह्या दोघांचीही सत्ता असते, अशा लोकांच्या दृष्टीत तो गुणातीत मनुष्य उदासीनाप्रमाणे दिसत असतो.

**गुणैर्यो न विचाल्यते**—त्याच्या म्हणविल्या जाणाऱ्या अंतःकरणात सत्त्व, रज आणि तम या गुणांच्या वृत्ती तर येतात, परंतु तो या वृत्तींमुळे विचलित होत नाही. तात्पर्य, जसे आपल्याशिवाय दुसऱ्याच्या अंतःकरणात गुणांच्या वृत्ती उत्पन्न झाल्या तर, आपल्यात काहीही फरक पडत नाही, तसेच त्याच्या (गुणातीताच्या) म्हणविल्या जाणाऱ्या अंतःकरणात गुणांच्या वृत्ती उत्पन्न झाल्यास त्याच्यात काहीही फरक पडत नाही अर्थात् तो त्या वृत्तींद्वारा विचलित केला जाऊ शकत नाही. कारण त्याच्या म्हणविल्या जाणाऱ्या अंतःकरणात अंतःकरणसहित संपूर्ण संसाराचा अत्यंत अभाव तसेच परमात्मतत्त्वाचा भाव निरंतर आपोआप स्वाभाविकच जागृत राहतो.

**गुणा वर्तन्त इत्येव योऽवतिष्ठति**—गुणच गुणांत वर्तत आहेत (३। २८) अर्थात् गुणांमध्येच संपूर्ण क्रिया होत आहेत, असे समजून तो आपल्या स्वरूपामध्ये निर्विकाररूपाने स्थित राहत असतो.

**न इङ्गते**—पूर्वी ''**गुणा वर्तन्त इत्येव**'' पदांनी गुणांशी त्याच्या संबंधाचा निषेध केला, आता ''**न इङ्गते**'' पदांनी त्याच्यात क्रियांचा अभाव सांगतात. तात्पर्य, गुणातीत पुरुष स्वतः काहीही क्रिया करीत नाही. कारण अविनाशी शुद्ध स्वरूपात कधी कोणती क्रिया होतच नसते.

[बावीसाव्या आणि तेवीसाव्या—या दोन श्लोकांत भगवंतांनी गुणातीत महापुरुषाची तटस्थता, निर्लिप्तता याचे वर्णन केले आहे.]

**परिशिष्ट भाव—'न विचाल्यते', 'अवतिष्ठति'** आणि **'नेङ्गते'**—ही तिन्ही पदे वास्तविक एकाच अर्थाची आहेत, तरीही ही तिन्ही पदे देण्याचे तात्पर्य असे आहे की, गुणातीत महापुरुष स्वतः स्वाभाविक अचल (स्थिरतेत) राहतो. तो स्वतःही विचलित होत नाही आणि कोणाकडूनही विचलित केला जाऊ शकत नाही.

'करणे', 'होणे' आणि 'आहे'—हे तीन विभाग आहेत. 'करणे' होण्यात आणि 'होणे' 'आहेत' बदलले गेले तर अहंकार पूर्णपणे नष्ट होतो. ज्याच्या अंतःकरणात क्रिया आणि पदार्थाचे महत्त्व आहे, असा असाधक (संसारी मनुष्य) मानतो की, 'मी क्रिया करीत आहे'—'**अहंकारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते**' (गीता ३। २७). जो कर्ता बनतो त्याला भोक्ता व्हावेच लागते. ज्याच्यात विवेकाची प्रधानता आहे, असा साधक अनुभव करतो की, 'क्रिया होत आहे'—'**गुणा गुणेषु वर्तन्ते**' (गीता ३। २८) अर्थात् 'मी काहीही करीत नाही'—'**नैव किञ्चित्करोमीति**' (गीता ५। ८). परंतु ज्याला तत्त्वज्ञान झाले आहे, असा सिद्ध

महापुरुष केवळ सत्ता आणि जाणणे मात्र ('आहे') चाच अनुभव करतो—'**योऽवतिष्ठति नेङ्गते**'. ती चिन्मय सत्ता संपूर्ण क्रियेत जशीच्या तशी परिपूर्ण असते. क्रियांचा तर अंत होतो, परंतु चिन्मय सत्ता जशीच्या तशी राहते. महापुरुषाची दृष्टी क्रियांवर न राहता सहजच एकमात्र असलेल्या चिन्मय सत्तेवरच ('आहे' वरच) राहते.

*संबंध—एकवीसाव्या श्लोकामध्ये अर्जुनाने दुसऱ्या प्रश्नाच्या रूपात गुणातीत पुरुषाचे आचरण विचारले होते. त्याचे उत्तर आता पुढील दोन श्लोकांत देत आहेत.*

**समदुःखसुखः स्वस्थः समलोष्टाश्मकाञ्चनः।**
**तुल्यप्रियाप्रियो धीरस्तुल्यनिन्दात्मसंस्तुतिः॥ २४॥**
**मानापमानयोस्तुल्यस्तुल्यो मित्रारिपक्षयोः।**
**सर्वारम्भपरित्यागी गुणातीतः स उच्यते॥ २५॥**

**धीरः** = जो धैर्यवान् मनुष्य
**समदुःखसुखः** = दुःख-सुखात सम (तसेच)
**स्वस्थः** = आपल्या स्वरूपात स्थित राहतो,
**समलोष्टाश्मकाञ्चनः** = जो मातीचे ढेकूळ, दगड आणि सोने यात सम राहतो
**तुल्यप्रियाप्रियः** = जो प्रिय-अप्रिय यात सम राहतो,
**तुल्यनिन्दात्मसंस्तुतिः** = जो आपल्या निंदास्तुतीत सम राहतो,
**मानापमानयोः** = जो मान-अपमानात
**तुल्य** = सम राहतो
**मित्रारिपक्षयोः** = जो मित्र-शत्रूच्या पक्षात
**तुल्यः** = सम राहतो (आणि)
**सर्वारम्भपरित्यागी** = जो संपूर्ण कर्मारंभाचा त्यागी आहे
**सः** = तो मनुष्य
**गुणातीतः** = गुणातीत
**उच्यते** = म्हटला जातो.

*व्याख्या*— **धीरः समदुःखसुखः**—नित्य-अनित्य, सार-असार, इत्यादीच्या तत्त्वाला जाणून घेऊन स्वतःसिद्ध स्वरूपात स्थित झाल्याने गुणातीत मनुष्य धैर्यवान् म्हणविला जातो.

पूर्वकर्मानुसार प्राप्त होणाऱ्या अनुकूल-प्रतिकूल परिस्थितीचे नाव ''सुख-दुःख'' आहे, अर्थात् प्रारब्धानुसार शरीर, इंद्रिये इत्यादीच्या अनुकूल परिस्थितीला सुख म्हणतात आणि शरीर, इंद्रियादींच्या प्रतिकूल परिस्थितीला दुःख म्हणतात. गुणातीत मनुष्य या दोन्हीत सम राहतो. तात्पर्य, सुख-दुःखरूप बाह्य परिस्थिती त्याच्या म्हणविल्या जाणाऱ्या अंतःकरणात विकार उत्पन्न करू शकत नाहीत, त्याला सुखी-दुःखी करू शकत नाहीत.

**स्वस्थः**—स्वरूपात सुख-दुःख नाहीच. स्वरूपाकडून तर सुख-दुःख प्रकाशित होतात. म्हणून गुणातीत मनुष्य येणाऱ्या-जाणाऱ्या सुख-दुःखाचा भोक्ता होत नाही, तर आपल्या नित्य-निरंतर राहणाऱ्या स्वरूपात स्थिर राहत असतो.

**समलोष्टाश्मकाञ्चनः**—त्याला मातीचे ढेकूळ, दगड, व सोने याविषयी आकर्षण (राग) नसते आणि विकर्षण (द्वेष) ही नसते. परंतु व्यवहार करताना तो मातीचे ढेकूळ मातीच्या जागीच ठेवतो, दगडाला दगडाच्या जागी ठेवतो आणि सोन्याला सोन्याच्या जागी (तिजोरी इत्यादीत) ठेवतो. तात्पर्य, जरी त्यांच्या प्राप्ती अप्राप्तीमध्ये त्याला हर्ष-शोक होत नाही, तो सम राहतो, तरीपण त्यांच्याशी व्यवहार यथायोग्य करीत असतो.

ढेकूळ, दगड आणि सोने याचे ज्ञान न होणे ह्याला समता म्हणत नाहीत. समता तीच आहे की, या तिन्हींचे ज्ञान असतानाही त्यांच्याविषयी राग-द्वेष नसावा. ज्ञान कधी दोषी नसते, विकारच दोषी असतात.

**तुल्यप्रियाप्रियः**—क्रियमाण कर्मांच्या सिद्धी असिद्धी-मध्ये अर्थात् त्यांच्या तात्कालिक फलाच्या प्राप्ती-अप्राप्तीमध्येही तो सम राहत असतो.

**तुल्यनिन्दात्मसंस्तुतिः**—निन्दा आणि स्तुतीमध्ये नावाची मुख्यता असते. गुणातीत मनुष्याचा नावाशी कोणताच संबंध राहत नसतो. म्हणून एखाद्याने निंदा केली तर त्याच्या चित्तात खिन्नता निर्माण होत नाही आणि एखाद्याने स्तुती केली तरी त्याच्या चित्ताला प्रसन्नता होत नाही. त्याचप्रमाणे निंदा करणाऱ्याविषयी त्याचा द्वेष नसतो आणि स्तुती करणाऱ्याविषयी त्याचा राग (आसक्ती) नसतो.

सामान्य मनुष्यांची ही एक सवय बनलेली असते की, त्यांना आपली निन्दा आवडत नाही आणि स्तुती आवडते. परंतु जे गुणातीत होतात, त्यांना निंदा स्तुतीचे ज्ञान तर होत असते आणि वर्तनही ते सर्वांशी यथोचितच करतात, परंतु त्यांच्या ठिकाणी निंदा-स्तुती संबंधाने खिन्नता-प्रसन्नता होत

नाहीं. कारण ते ज्या तत्त्वात स्थित असतात, त्याठिकाणी गुणांनी युक्त परकृत निंदा-स्तुती पोहचतच नाही.

निंदा आणि स्तुती—या दोन्हीही परकृत क्रिया आहेत. त्या क्रियांमुळे खूश-नाखूश होणे चूक आहे. कारण ज्याचा जसा स्वभाव असतो, जशी धारणा असते, तो त्यानुसारच बोलत असतो. त्याने आपल्या अनुकूलच बोलावे, आपली निंदा करू नये—हा न्याय नाही अर्थात् त्याला बोलण्यात बाध्य करण्याचा भाव न्याय्य नाही, अन्याय आहे. दुसऱ्यावर आपला काय अधिकार आहे की, त्यांनी आपली निंदा करू नये? आपली स्तुतीच करावी? दुसरी गोष्ट, एखादा निंदा करत असेल तर त्यात साधकाने प्रसन्न राहिले पाहिजे की, यामुळे माझे पाप समाप्त होत आहे, मी शुद्ध होत आहे. जर एखादा आपली प्रशंसा करीत असेल तर त्यामुळे आपले पुण्य समाप्त होत असते म्हणून प्रशंसेत खूश होऊ नये कारण खूश होण्यात धोका आहे.

**मानापमानयोस्तुल्यः**—मान आणि अपमान होण्यात शरीराची मुख्यता असते. गुणातीत मनुष्याचे शरीराशी तादात्म्य राहत नाही. म्हणून कोणी त्याचा आदर करो अथवा अनादर करो, मान करो अथवा अपमान करो, या परकृत क्रियांचा त्याच्यावर कोणताही परिणाम होत नाही.

निंदा-स्तुती आणि मान-अपमान या दोन्हीही परकृत क्रियांमध्ये गुणातीत मनुष्य सम राहतो. या दोन्ही परकृत क्रियांचे ज्ञान होणे दोष नाही, तर निंदा आणि अपमानामध्ये दु:खी होणे तसेच स्तुती आणि मानामध्ये हर्षित होणे दोष आहे, कारण हे दोन्हीही प्रकृतीचे विकार आहेत. गुणातीत पुरुषाला निंदा-स्तुती आणि मान-अपमानाचे ज्ञान तर होत असते परंतु गुणांशी संबंध-विच्छेद झाल्याने, नाव आणि शरीराशी तादात्म्य न राहण्याने तो सुखी-दु:खी होत नाही. कारण तो ज्या तत्त्वात स्थित आहे, त्या ठिकाणी हे विकार नसतात. ते तत्त्व गुणरहित आहे आणि निर्विकार आहे.

**तुल्यो मित्रारिपक्षयोः**—तो मित्र आणि शत्रू पक्षात सम राहतो. जरी गुणातीत मनुष्याच्या दृष्टीमध्ये कोणी मित्र आणि शत्रू नसतो, तरीपण दुसरे लोक आपल्या भावनेनुसार त्याला आपला मित्र अथवा शत्रू समजू शकतात. सामान्य मनुष्यालाही दुसरे लोक आपल्या भावनेनुसार मित्र अथवा शत्रू समजू शकतात. परंतु ही गोष्ट लक्षात आल्यावर त्या मनुष्यावर याचा परिणाम होतो. त्यामुळे त्याचे ठिकाणी राग-द्वेष उत्पन्न होऊ शकतात. परंतु गुणातीत मनुष्याला ही गोष्ट लक्षात आली तरीही काही परिणाम होत नाही. वास्तविक मित्र आणि शत्रू या भावनेमुळेच व्यवहारात पक्षपात होत असतो. गुणातीत मनुष्याच्या म्हणविल्या जाणाऱ्या अंत:करणात मित्र-शत्रूची भावनाच नसते, म्हणून त्याच्या व्यवहारात पक्षपात होत नसतो.

एक व्यक्ती त्या महापुरुषाशी मित्रता ठेवते आणि दुसरी व्यक्ती आपल्या स्वभावानुसार त्या महापुरुषाशी शत्रूता ठेवते. जेव्हा त्या दोघा व्यक्तींना न्याय देण्याचा प्रसंग येतो तेव्हा (व्यवहारात) तो मित्रता ठेवणाऱ्यापेक्षा शत्रूता ठेवणाऱ्याचा थोडा अधिक पक्ष घेईल. जसे पदार्थादिकांच्या वाटणीच्या वेळी तो मित्रता ठेवणाऱ्यास कमी (तितकेच, जितके तो प्रसन्नतेने सहन करू शकतो) आणि शत्रूता ठेवणाऱ्यास थोडा जास्त पदार्थ देतो. ही देखील समताच म्हणविली जाते. कारण आपल्या पक्षातील व्यक्तीला बरोबर न्याय आणि विपक्षाच्या व्यक्तीविषयी उदारता असली पाहिजे.

**सर्वारम्भपरित्यागी**—तो महापुरुष संपूर्ण कर्मारंभाचा त्यागी असतो. तात्पर्य धन-संपत्तीचा संग्रह आणि भोग ह्यासाठी तो कोणत्याही प्रकारचे नवीन कर्म आरंभ करीत नाही. स्वत:प्राप्त परिस्थितीनुसारच त्याची प्रवृत्ती आणि निवृत्ती आपोआप होत असते अर्थात् क्रियेमध्ये त्याची प्रवृत्ती कामना, वासना, ममतारहित असते आणि निवृत्तीही मान-मोठेपण इत्यादीच्या इच्छेने रहित असते.

**गुणातीतः स उच्यते**—येथे "**उच्यते**" पदाने असा ध्वनी निघतो की, त्या महापुरुषाची "गुणातीत" संज्ञा नाही. परंतु त्याचे म्हणविले जाणारे शरीर, अंत:-करणाची लक्षणे यावरुनच त्याला गुणातीत म्हटले जाते.

वास्तविक पाहिले तर जो गुणातीत आहे, त्याची लक्षणे होऊ शकत नाहीत. लक्षणे तर गुणामुळेच होतात. म्हणून ज्याची लक्षणे असतील तो गुणातीत कसा असू शकतो? परंतु अर्जुनानेही गुणातीताचीच लक्षणे विचारली आहेत आणि भगवंतांनीही गुणातीताचीच लक्षणे सांगितली आहेत. याचे तात्पर्य हे आहे की, लोक पूर्वी त्या गुणातीताची ज्या शरीर आणि अंत:करणाच्या ठिकाणी स्थिती समजत होते, त्याच शरीर आणि अंत:करणाच्या लक्षणावरुन त्याच्यात आरोप करतात की, हा गुणातीत मनुष्य आहे. म्हणून ही लक्षणे गुणातीत मनुष्याला ओळखण्यासाठी संकेतमात्र आहेत.

प्रकृतीचे कार्य गुण आहे आणि गुणांचे कार्य शरीर-इंद्रिये-मन-बुद्धी आहेत. म्हणून मन-बुद्धी इत्यादीद्वारा आपले कारण असलेल्या गुणांचेही पूर्ण वर्णन होऊ शकत

नाही, तर मग गुणांचेही कारण असलेल्या प्रकृतीचे वर्णन होऊच कसे शकते ? जो प्रकृतीच्याही सर्वथा पलीकडे गेला (गुणातीत) आहे त्याचे वर्णन मन-बुद्धी इत्यादीकडून होणे अशक्यच आहे. वास्तविक गुणातीताची ही लक्षणे स्वरूपात तर नसतातच परंतु अंत:करणात मानलेली अहंता-ममता नष्ट झाल्याने त्याचे म्हणविले जाणाऱ्या अंत:-करणाच्या माध्यमानेच ही लक्षणे—गुणातीताची लक्षणे म्हटली जातात.

येथे भगवंतांनी सुख-दु:ख, प्रिय-अप्रिय, निंदा-स्तुती आणि मान-अपमान ही आठ परस्पर विरुद्ध नावे घेतली आहेत. ज्यात सामान्य माणसाची तर विषमता होतेच, साधकांचीसुद्धा कधी कधी विषमता होते. अशा या आठ कठीण ठिकाणी ज्याची समता होते त्याच्यासाठी इतर सर्व अवस्थेत समता राखणे सुगम होते. म्हणून येथे त्याच आठ कठीण स्थलांची नावे घेऊन भगवान् हे सांगतात की, गुणातीत महापुरुषाच्या या आठही स्थलात आपोआप स्वाभाविक समता राहत असते.

गुणातीत मनुष्याची जी स्वत:सिद्ध निर्विकारता असते, त्याची जी स्वाभाविक स्थिती असते, त्यात अनुकूल-प्रतिकूल परिस्थिती आल्या-गेल्याने काहीच फरक पडत नाही. त्याची निर्विकारता, समता जशीच्या तशी अटळ राहत असते, त्याची शांती कधी भंग होत नाही.

[चोवीसाव्या आणि पंचवीसाव्या या दोन श्लोकात भगवंतांनी गुणातीत महापुरुषाच्या समतेचे वर्णन केले आहे]

**परिशिष्ट भाव**—राग-द्वेषादी विकार जडातही राहत नाहीत किंवा चेतनातही राहत नाहीत आणि ते अंत:करणाचेही धर्म नाहीत, तर हे देहाभिमानात राहतात. देहाभिमानसुद्धा वास्तविक नाहीच, तर अविवेक-अविचारपूर्वक मानलेला आहे. तात्पर्य हे आहे की, वास्तविक विकार आपल्यात नाहीत, परंतु मनुष्य अविवेकामुळे आपल्यात मानतो. तो विकारांच्या भावाचा आणि अभावाचा तसेच स्वयंच्या भावाचा अनुभव तर करतो, परंतु त्या अनुभवाला महत्त्व देत नाही. जर त्याने विवेक-विचारपूर्वक आपल्यात विकारांच्या अभावाचा अनुभव केला तर तो त्यांचा भोक्ता (सुखी-दु:खी) होणार नाही.

***संबंध**—अर्जुनाने तीसऱ्या प्रश्नरूपात गुणातीत होण्याचा उपाय विचारला होता, त्याचे उत्तर भगवान् पुढील श्लोकात देत आहेत.*

# मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते।
# स गुणान्समतीत्यैतान्ब्रह्मभूयाय कल्पते॥ २६ ॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **च** | = आणि | **माम्** | = माझा | **गुणान्** | = गुणांचे |
| **य:** | = जो मनुष्य | **सेवते** | = स्वीकार करतो, | **समतीत्य** | = अतिक्रमण करून |
| **अव्यभिचारेण** | = अव्यभिचारी | **स:** | = तो | **ब्रह्मभूयाय** | = ब्रह्मप्राप्तीचा |
| **भक्तियोगेन** | = भक्तियोगाद्वारा | **एतान्** | = या | **कल्पते** | = प्राप्त होतो |

***व्याख्या***— [जरी भगवंतांनी या अध्यायाच्या एकोणीसाव्या विसाव्या श्लोकांत गुणांचे अतिक्रमण करण्याचा उपाय सांगितला होता, तरीही अर्जुनाने एकवीसाव्या श्लोकात गुणातीत होण्याचा उपाय विचारला आहे. यावरुन असे वाटते की, अर्जुन त्या उपायाशिवाय गुणातीत होण्यासाठी दुसरा कोणता तरी उपाय जाणू इच्छित आहेत. म्हणून अर्जुनाला भक्तीचा अधिकारी समजून भगवान् त्यांना गुणातीत होण्याचा उपाय भक्ती सांगतात.]

**मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते**—या पदांत उपासक, उपास्य आणि उपासना—हे तिन्हीही आले आहेत. अर्थात् **''य:''** पदाने उपासक, **''माम्''** पदाने उपास्य आणि **''अव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते''** पदांनी ''उपासना'' आली आहे.

**''अव्यभिचारेण''** पदाचे तात्पर्य दुसऱ्या कशाचाही आधार नसावा. सांसारिक आधार तर दूरच राहो, ज्ञानयोग, कर्मयोग इत्यादी योगांचा (साधनांचा) सुद्धा आधार नसावा आणि **''भक्तियोगेन''** पदाचे तात्पर्य हे आहे की, केवळ भगवंताचाच आधार असावा, आश्रय असावा, आशा असावी, बळ असावे, विश्वास असावा. अशा रीतीने **''अव्यभिचारेण''** पदाने दुसऱ्यांचा आश्रय घेण्याविषयी निषेध करून **''भक्तियोगेन''** पदाने केवळ भगवंताचाच आश्रय घेण्याविषयी सांगितले गेले आहे.

**''सेवते''** पदाचे तात्पर्य अव्यभिचारी भक्तियोगाद्वारा भगवंताचे भजन करावे, त्यांची उपासना करावी, त्यांना शरण जावे, त्यांच्या अनुकूल आचरण करावे.

**स गुणान्समतीत्यैतान्**—जो अनन्यभावाने केवळ भगवंतालाच शरण जातो, त्याला गुणांचे अतिक्रमण करावे लागत नाही, तर भगवंताच्या कृपेने त्याच्याकडून आपोआप गुणांचे अतिक्रमण होत असते (१२।६, ७)

**ब्रह्मभूयाय कल्पते**—तो गुणांचे अतिक्रमण करून ब्रह्मप्राप्तीला पात्र (अधिकारी) होतो. भगवंतांनी या ठिकाणी जर भक्तीविषयी सांगितले आहे, तर मग भगवंतांनी येथे ब्रह्मप्राप्तीविषयी न सांगता आपल्या प्राप्तीविषयी सांगावयास पाहिजे होते. परंतु येथे ब्रह्मप्राप्तीविषयी सांगण्याचे तात्पर्य असे आहे की, अर्जुनाने गुणातीत होण्याचा (निर्गुण ब्रह्माच्या प्राप्तीचा) उपाय विचारला होता, म्हणून भगवंतांनी आपल्या भक्तीला ब्रह्मप्राप्तीचा उपाय सांगितला.

दुसरी गोष्ट, शास्त्रात असे म्हटले गेले आहे की, भगवंताची उपासना करणाऱ्यांना ज्ञानाच्या भूमिकांच्या सिद्धी- साठी दुसरे कोणतेही साधन, प्रयत्न करावा लागत नाही, तर त्याच्यासाठी ज्ञानाच्या भूमिका आपोआप सिद्ध होतात. त्याच गोष्टीला उद्देशून भगवान् येथे म्हणत आहेत की, अव्यभिचारी भक्तियोगाने माझा स्वीकार करणाऱ्याला ब्रह्मप्राप्तीचा पात्र होण्यासाठी दुसरे कोणतेही साधन करावे लागत नाही, तर तो आपोआप ब्रह्मप्राप्तीला पात्र होतो. परंतु तो भक्त ब्रह्मप्राप्तीत संतोष मानीत नाही. त्याचा तर असा भाव राहतो की, भगवान् कसे प्रसन्न होतील ? भगवंताच्या प्रसन्नतेतच त्याची प्रसन्नता असते. तात्पर्य, जो केवळ भगवत्परायणच असतो, भगवंताविषयीच आकृष्ट असतो, त्याच्यासाठी ब्रह्मप्राप्ती स्वत:सिद्ध आहे. तो ब्रह्मप्राप्तीला महत्त्व देवो अथवा न देवो—ही गोष्ट दुसरी आहे, परंतु तो ब्रह्मप्राप्तीचा अधिकारी आपोआप होतो.

तीसरी गोष्ट, ज्या तत्त्वाची प्राप्ती ज्ञानयोग, कर्मयोग इत्यादी साधनेने होते, त्याच तत्त्वाची प्राप्ती भक्तीनेही होत असते. साधनेत भेद असला तरीही त्या तत्त्वाच्या प्राप्तीत कोणता भेद नसतो.

**परिशिष्ट भाव**—भक्तीद्वारा साधक जे काही इच्छितो, त्याची प्राप्ती होते. जो साधक मुख्यरूपाने ब्रह्मप्राप्ती अर्थात् मुक्ती, तत्त्वज्ञान इच्छितो त्याला भक्ती केल्याने ब्रह्मप्राप्ती होते. कारण ब्रह्माची प्रतिष्ठा भगवान्‌च आहेत (याच अध्यायाचा सत्तावीसावा श्लोक). ब्रह्म समग्र भगवंताचेच एक अंग आहे, स्वरूप आहे (गीता—सातव्या अध्यायाचा एकोणतीसावा-तीसावा श्लोक). तेराव्या अध्यायाच्या दहाव्या श्लोकातही भक्तीला ज्ञानप्राप्तीचे साधन सांगितले गेले आहे.

श्रीमद्भागवतात सगुणाच्या उपासनेला निर्गुण (गुणांतीत) सांगितले आहे. जसे—**'मन्निकेतं तु निर्गुणम्'** (११।२५।२५), **'मत्सेवायां तु निर्गुणा'** (११।२१।२७) इत्यादी. म्हणून सगुणाची उपासना करणारा तिन्ही गुणांहून अतीत होतो. सगुण भगवान्‌ही गुणांच्या आश्रित नाहीत, तर गुण त्यांच्या आश्रित आहेत. जो सत्त्व-रज-तम गुणांच्या वशमध्ये आहे त्याचे नाव 'सगुण' नाही, तर ज्यात असीम ऐश्वर्य, माधुर्य, सौंदर्य, औदार्य इत्यादी अनंत दिव्य गुण नित्य विद्यमान राहतात, त्याचे नाव 'सगुण' आहे. भगवंताद्वारा सात्त्विक, राजस अथवा तामस क्रिया होऊ शकतात, परंतु ते त्या गुणांच्या वश नसतात.

भगवंताकडे अग्रेसर होण्याने भक्त आपोआप आणि सुगमतेने गुणातीत होतो. एवढेच नव्हे, त्याला भगवंताच्या समग्र रूपाचेही ज्ञान होते.

***संबंध**—उपासना तर करावी भगवंताची आणि पात्र व्हावे ब्रह्मप्राप्तीचे—हे कसे काय ? याचे उत्तर पुढील श्लोकात देतात.*

## ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहममृतस्याव्ययस्य च।
## शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकान्तिकस्य च॥ २७॥

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **हि** | = कारण | **अमृतस्य** | = अमृताचा | **च** | = आणि |
| **ब्रह्मण:** | = ब्रह्माचा | **च** | = तसेच | **ऐकान्तिकस्य** | = ऐकांतिक |
| **च** | = आणि | **शाश्वतस्य** | = शाश्वत | **सुखस्य** | = सुखाचा |
| **अव्ययस्य** | = अविनाशी | **धर्मस्य** | = धर्माचा | **प्रतिष्ठा** | = आश्रय |
| | | | | **अहम्** | = मी (च आहे). |

***व्याख्या***—**ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहम्**—मी ब्रह्माची प्रतिष्ठा, आश्रय आहे—असे म्हणण्याचे तात्पर्य ब्रह्माशी आपली अभिन्नता सांगण्यात आहे. जसे जळत असलेला अग्नी साकार असतो आणि काष्ठ इत्यादीमध्ये राहणारा अग्नी निराकार असतो—ही अग्नीची दोन रूपे आहेत, परंतु तात्त्विक दृष्टीने अग्नी एकच आहे. तसेच भगवान् साकाररूपाने आहेत आणि ब्रह्म निराकाररूपाने आहे. ही दोन रूपे साधकांच्या उपासनेच्या दृष्टीने आहेत, परंतु वास्तविक भगवान् आणि ब्रह्म एकच आहेत दोन नाहीत.

जसे भोजनात एक सुगंध असतो आणि एक स्वाद असतो. नाकाच्या दृष्टीने सुगंध असतो आणि रसनेच्या दृष्टीने स्वाद असतो, पण भोजन तर एकच असते. तसेच ज्ञानाच्या

दृष्टीने ब्रह्म आहे आणि भक्तीच्या दृष्टीने भगवान् आहेत, परंतु तात्त्विक दृष्टीने भगवान् आणि ब्रह्म एकच आहेत.

भगवान् कृष्ण वेगळे आणि ब्रह्म वेगळे असा भेद नाही तर भगवान् कृष्णच ब्रह्म आहेत आणि ब्रह्मच भगवान् कृष्ण आहेत. गीतेत भगवंतांनी आपल्यासाठी "ब्रह्म" शब्दाचाही प्रयोग केला आहे "**ब्रह्मण्याधाय कर्माणि**" (५।१०) आणि आपल्याला "अव्यक्तमूर्ति" ही म्हटले आहे—"**मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना**" (९।४). तात्पर्य साकार आणि निराकार एकच आहेत, दोन नाहीत.

**अमृतस्याव्ययस्य च**—अविनाशी अमृताचे अधिष्ठान मीच आहे आणि माझेच अधिष्ठान अविनाशी अमृत आहे. तात्पर्य अविनाशी अमृत आणि मी ही दोन तत्त्व नाहीत, तर एकच आहेत. याच अविनाशी अमृताच्या प्राप्तीला भगवंतांनी "**अमृतमश्नुते**" (१३।१२, १४।२०) पदाने सांगितले आहे.

**शाश्वतस्य च धर्मस्य**—सनातन धर्माचा आधार मी आहे आणि माझा आधार सनातन धर्म आहे. तात्पर्य सनातन धर्म आणि मी हे दोन नाहीत तर एकच आहेत. सनातन धर्म माझेच स्वरूप आहे.* गीतेत अर्जुनाने भगवंतांना शाश्वत धर्माचा गोप्ता (रक्षक) म्हटले आहे (११।१८). भगवंतही अवतार घेऊन सनातन धर्माचे रक्षण करत असतात. (४।८)

**सुखस्यैकान्तिकस्य च**—ऐकान्तिक सुखाचा आधार मी आहे आणि माझा आधार ऐकांतिक सुख आहे अर्थात् माझेच स्वरूप ऐकान्तिक सुख आहे. भगवंतांनी याच ऐकान्तिक सुखाला "अक्षय सुख" (५।२१), "आत्यन्तिक सुख" (६।२१) आणि "अत्यंत सुख" (६।२८) नावाने म्हटले आहे.

या श्लोकात "**ब्रह्मणः**", "**अमृतस्य**" इत्यादी पदांमध्ये "**राहोःशिरः**" प्रमाणे अभिन्नतेत षष्ठी विभक्तीचा प्रयोग केला गेला आहे. तात्पर्य "राहूचे शिर" असा जो प्रयोग होतो, त्यात राहू वेगळा आणि शिर वेगळे आहे—अशी गोष्ट नाही तर राहूचे नावच शिर आहे आणि शिराचे नावच राहू आहे. तसेच येथे ब्रह्म, अविनाशी अमृत इत्यादीच भगवान् कृष्ण आहेत आणि भगवान् कृष्णच ब्रह्म, अविनाशी अमृत इत्यादी आहेत.

ब्रह्म म्हणा अथवा कृष्ण म्हणा आणि कृष्ण म्हणा अथवा ब्रह्म म्हणा, अविनाशी अमृत म्हणा अथवा कृष्ण म्हणा आणि कृष्ण म्हणा अथवा अविनाशी अमृत म्हणा, शाश्वत धर्म म्हणा अथवा कृष्ण म्हणा आणि कृष्ण म्हणा अथवा शाश्वत धर्म म्हणा, ऐकान्तिक सुख म्हणा अथवा कृष्ण म्हणा आणि कृष्ण म्हणा अथवा ऐकान्तिक सुख म्हणा, एकच गोष्ट आहे. यात कोणता आधार-आधेय भाव नाही, एकच तत्त्व आहे. म्हणून भगवंताची उपासना करण्याने ब्रह्माची प्राप्ती होते, ही गोष्ट योग्यच आहे.

**परिशिष्ट भाव**—'ब्रह्म तसेच अविनाशी अमृताचा आश्रय मी आहे'—ही निर्गुण-निराकाराची तसेच ज्ञानयोगाची गोष्ट आहे, 'शाश्वतधर्माचा आश्रय मी आहे'—ही सगुण-साकाराची तसेच कर्मयोगाची गोष्ट आहे आणि 'ऐकान्तिक सुखाचा आश्रय मी आहे'—ही सगुण-निराकाराची आणि ध्यानयोगाची गोष्ट आहे. तात्पर्य हे निघाले की, माझी उपासना (सगुण-साकाराची उपासना) करण्याने, माझा आश्रय घेण्याने ज्ञानयोग, कर्मयोग आणि ध्यानयोग—तिन्ही सिद्ध होतात. तिन्हीने एकाच तत्त्वाची प्राप्ती होते, ज्याला 'समग्र' म्हणतात.

जितक्या काही विभूतीं आहेत, ते सर्व भगवंताचे ऐश्वर्य आहे, ब्रह्महो भगवंताची एक विभूती आहे, ऐश्वर्य आहे. म्हणून भगवंताने येथे म्हटले आहे—'**ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहम्**'. पद्मपुराणात आले आहे की, भगवान् श्रीकृष्णाच्याच नखाचे एक किरण 'ब्रह्म' आहे—

**यन्नखेन्दुरुचिर्ब्रह्म ध्येयं ब्रह्मादिभिः सुरैः। गुणत्रयमतीतं तं वन्दे वृन्दावनेश्वरम्॥**

(पाताल० ७७।६०)

---

* हिन्दू (सनातन), बौद्ध, ख्रिश्चन आणि मुस्लिम—हे चार धर्म वर्तमानकाळात संसारात मुख्य मानले जातात. या चारीपैकी एका-एका धर्माला मानणाऱ्यांची संख्या कोट्यावधी आहे. यात बौद्ध, ख्रिश्चन आणि मुस्लिम धर्माचे संस्थापक क्रमाने बुद्ध, येशू व मोहम्मद मानले जातात. हे तिन्हीही धर्म अर्वाचीन (अलीकडचे) आहेत. परंतु हिन्दूधर्म कोणत्याही मनुष्याकडून स्थापित झालेला नाही अर्थात् ही कोणत्याही मानवाच्या बुद्धीची निर्मिती नाही. हे तर विभिन्न ऋषींकडून केलेले अन्वेषण आहे, संशोधन आहे. संशोधन (शोध) त्याचेच होत असते जे त्यापूर्वी अस्तित्वात असते. हिन्दूधर्म अनादी, अनन्त तसेच शाश्वत आहे. जसे भगवान् शाश्वत (सनातन) आहेत, तसेच हिन्दूधर्मही शाश्वत आहे. म्हणूनच भगवंतांनी येथे (१४।२७ मध्ये) सनातन हिन्दूधर्माला आपले स्वरूप सांगितले आहे. जेव्हा जेव्हा हिन्दूधर्माचा ऱ्हास होतो, तेव्हा तेव्हा भगवान् अवतार घेऊन त्याची संस्थापना करतात. (४।७-८) तात्पर्य भगवान्सुद्धा याची संस्थापना व रक्षण करण्यासाठीच अवतार घेतात, त्याला बनविण्यासाठी अथवा उत्पन्न करण्यासाठी नव्हे. वास्तविक अन्य सर्वच धर्म तसेच मत-मतांतरेही याच सनातन धर्मापासून उत्पन्न झाली आहेत. म्हणून त्या धर्मामध्ये मनुष्याच्या कल्याणासाठी जी साधने सांगितली गेली आहेत त्यांनाही हिन्दूधर्माचीच देणगी मानली पाहिजे. म्हणून त्या धर्मात सांगितल्या गेलेल्या अनुष्ठानांचेही निष्कामभावनेने कर्तव्य समजून पालन केले गेले, तर कल्याण होण्याविषयी संशय मानू नये. प्राणीमात्राच्या हितासाठी जितका सखोल विचार हिन्दूधर्मात केला गेला आहे, तितका दुसऱ्या कोणत्याही धर्मात आढळत नाही. हिन्दूधर्माचे सर्वच सिद्धांत पूर्णतः वैज्ञानिक आणि कल्याण करणारे आहेत.

'(भगवान् शंकर म्हणतात—) ज्यांच्या नखचंद्राच्या कांतीरूप ब्रह्माचे देवतागण ध्यान करतात, त्या त्रिगुणातीत वृन्दावनेश्वर भगवान् श्रीकृष्णाची मी वंदना करतो.'

**ॐतत्सदिति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे गुणत्रयविभागयोगो नाम चतुर्दशोऽध्यायः॥ १४॥**

**अशा प्रकारे ॐ तत् सत् या भगवन्नामाच्या उच्चारणपूर्वक ब्रह्मविद्या आणि योगशास्त्रमय श्रीमद्भगवद्गीतोपनिषद्रूपी श्रीकृष्णार्जुनसंवादात "गुणत्रयविभागयोग" नावाचा चौदावा अध्याय पूर्ण झाला॥ १४॥**

या अध्यायामध्ये सत्त्व, रज आणि तम या तीन्ही गुणांचे विभागपूर्वक वर्णन केले गेले आहे. ह्या तिन्ही गुणांच्या पलीकडे गेल्यावर, यांचा संबंध सुटल्यावर परमात्म्याशी नित्ययोगाचा अनुभव होतो. म्हणून या अध्यायाचे नाव "गुणत्रयविभागयोग" ठेवले गेले आहे.

## चौदाव्या अध्यायाची पदे, अक्षरे आणि उवाच

(१) या अध्यायात "**अथ चतुर्दशोऽध्यायः**" ची तीन, "**श्रीभगवानुवाच**" इत्यादी पदांची सहा, श्लोकांची तीनशे बावीस आणि पुष्पिकेची तेरा पदे आहेत. अशा प्रकारे संपूर्ण पदांचा योग तीनशे चव्वेचाळीस आहे.

(२) या अध्यायात "**अथ चतुर्दशोऽध्यायः**" ची आठ, "**श्रीभगवानुवाच**" इत्यादी पदांची वीस, श्लोकांची आठशे चौसष्ठ आणि पुष्पिकेची एकावन्न अक्षरे आहेत. अशा प्रकारे संपूर्ण अक्षरांचा योग नऊशे त्रेचाळीस आहे. या अध्यायाचे सर्वच श्लोक बत्तीस अक्षरांचे आहेत.

(३) या अध्यायात तीन उवाच आहेत, दोन "**श्रीभगवानुवाच**" आणि एक "**अर्जुनउवाच**"

## चौदाव्या अध्यायात प्रयुक्त छन्द

या अध्यायाच्या सत्तावीस श्लोकांपैकी पाचव्या श्लोकाच्या प्रथम चरणात "नगण" प्रयुक्त असल्याने "**न-विपुला**", सहाव्या आणि दहाव्या श्लोकांच्या प्रथम चरणात "रगण" प्रयुक्त असल्याने "**र-विपुला**," पंधराव्या आणि सतराव्या श्लोकांच्या तृतीय चरणात "भगण" प्रयुक्त असल्याने "**भ-विपुला**", एकोणीसाव्या श्लोकाच्या प्रथम चरणात "मगण" प्रयुक्त असल्याने "**म-विपुला**" आणि नवव्या श्लोकाच्या प्रथम चरणात "भगण" तसेच तीसऱ्या चरणात "नगण" प्रयुक्त असल्याने "**संकीर्ण-विपुला**" संज्ञा असणारे छन्द आहेत. शेष वीस श्लोक ठीक "**पथ्यावक्त्र**" अनुष्टुप् छन्दाच्या लक्षणांनी युक्त आहेत.